SANCTIONED FOR USE IN GOVT. SCHOOLS

# GEMS OF MARATHI PROSE

## PART II

FOR ANGLO-MARATHI STANDARDS

Improved & Enlarged Edition

# गद्यरत्नसमुच्चय

## भाग दुसरा

आंग्लो-मराठी इयत्तांकरितां

लक्ष्मण गणेशशास्त्री लेले

यांनीं तयार केला.

नवीन आवृत्ति

आगष्ट सन १९२७

# सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ति.

---

या पुस्तकाची पहिली आवृत्ति इ० स० १९०७ च्या मार्च महिन्यांत प्रसिद्ध झाली. तेव्हांपासून आतांपर्यंत याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. तथापि त्यांत विशेष फेरफार कांहीं केला नाहीं. पुस्तकांत अधिक धडे घालून तें मोठें करण्याविषयींची सूचना कित्येक शिक्षकांनीं मध्यंतरीं केली. तिच्या अनुरोधानें प्रस्तुतची सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ति काढिली आहे. पुस्तकाचा आकार, त्यांतील मजकूर व त्याचा टाईप या तीनही गोष्टींत फेरफार केले आहेत. हे वाचकांस व शिक्षकांस आवडतील असा भरंवसा वाटत आहे. पूर्वीच्या आवृत्तींतल्यापेक्षां प्रस्तुत आवृत्तीत जवळ जवळ दुप्पट मजकूर आला आहे. भाषा व विषय यांचे विविधत्व व वैचित्र्यही अधिक आहे; तसेंच आधीं सुलभ व नंतर क्रमाक्रमानें कठीण अशी धड्यांची योजना करण्याकडे विशेष लक्ष पुरविलें आहे. हा शेवटला हेतु चांगला सिद्ध व्हावा, म्हणून प्रस्तुत पुस्तकाचे दोन वेगळे भाग केले आहेत. पहिल्यांत २८ नामांकित ग्रंथकारांचे ४० उतारे आहेत व दुसऱ्यांत १५ सुप्रसिद्ध ग्रंथकारांचे ३६ उतारे आहेत. पुस्तकाचीं क्राऊन षोडशपत्री आकाराची पृष्ठें १७० झालीं आहेत.

गेल्या बारा वर्षांत मराठी गद्यवाङ्मयांत बरीच भर पडली आहे. तिचा संक्षिप्त इतिहास, तसेंच ज्या ग्रंथकारांचे उतारे पुस्तकांत घेतले आहेत त्यांची व त्यांच्या ग्रंथांची थोडी माहिती या पुस्तकाच्या आरंभीं देण्याचा विचार होता, तथापि कागदाच्या महर्गतेमुळे तो सध्यां बाजूला ठेवावा लागला. मागील आवृत्तींतील ‘ मराठी गद्यरचनेसंबंधानें चार शब्द ’ या आवृत्तीत तसेच छापले आहेत.

प्रस्तुत पुस्तक बरेंच मोठें झाल्यामुळें त्याची किंमत वाढविणें प्राप्त झालें. परंतु उतारे पुष्कळ व विविध असल्यामुळें त्याची उपयुक्तताही वाढली आहे. म्याट्रिक्युलेशन, स्कूललीव्हिंग, प्रवेशपरीक्षा, व ट्रेनिंग कॉलेजांतील निरनिराळ्या

परीक्षा यांच्याकरितां तयारी करणाऱ्या विद्यार्थ्यांना या पुस्तकाचा मोठाच उपयोग होईल. उतारे आलटून पालटून दोन वर्षे वाचतां येतील इतके असल्यामुळें हायस्कुलांतील सहाव्या व सातव्या इयत्तांतील मुलांची या पुस्तकानें विशेष चांगली सोय झाली आहे.

मुंबई इलाख्याच्या डायरेक्टरसाहेबांनीं प्रस्तुत पुस्तकांस मंजुरी देऊन त्यास प्रोत्साहन दिलें याबद्दल त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानणें आवश्यक आहे. पुणें येथील नूतन मराठी विद्यालयाच्या अधिकाऱ्यांनीं तर हें पुस्तक आपलेंच आहे अशा उदार भावनेनें त्याचा प्रसार आपल्या शाळेंत सारखा चालू ठेविला. यासंबंधानें सदर अधिकाऱ्यांच्या कायमचें ऋणांत राहणेंच आम्हांस आनंददायक वाटत आहे. अन्यत्र अनेक सरकारी व खासगी शाळांतून ह्या पुस्तकास आश्रय मिळत आहे याबद्दल आम्हांस कृतज्ञता व संतोष वाटत आहे. या सर्व आश्रयदात्यांनीं व इतरांनींही या नव्या सुधारून वाढविलेल्या आवृत्तीचा योग्य तो परामर्श घ्यावा व तिला आश्रय द्यावा अशी सविनय विनंति आहे. इतर वाचनप्रिय गृहस्थांनींही हिच्यावर कृपाकटाक्ष टाकल्यास आम्हांस प्रोत्साहनच मिळणार आहे.

**लक्ष्मण गणेशशास्त्री लेले.**

———

# मराठी ग्रंथरचनेसंबंधानें चार शब्द.



प्रस्तुत ग्रंथ निवडक गद्यात्मक वेच्यांचा संग्रह आहे हें त्याच्या नांवावरूनच लक्ष्यांत येण्यासारखें आहे. गद्यरचनेसंबंधानें येथें चार शब्द लिहिणें प्रासंगिक वाटल्यावरून ते खालीं लिहिले आहेत. त्यांवरूनच वाचकांस आपल्याइकडील गद्यरचनेचा इतिहास थोडक्यांत समजेल व तिचें महत्त्वही त्यांच्या लक्ष्यांत येईल.

गद्य हा शब्द गद् म्हणजे बोलणें या धातूपासून साधला आहे. गद्य हें रूप भविष्य कृदन्ताचें असून त्याचा यौगिक अर्थ ' जें बोलावयाचें तें ' असा आहे; आणि यावरून, छन्द वगैरेंचा निर्बंध ज्यांत नाहीं, म्हणजे अर्थात् साहजिक भाषेप्रमाणेंच ज्यांत शब्दरचना आहे, अशा रचनेला गद्य ही संज्ञा रूढ झाली. शास्त्रीय, व्यावहारिक किंवा इतर मनन करण्यासारखे गंभीर विषय लिहावयाला ग्रंथरचना अधिक सोयकर पडते. मनोरंजक विषयाला छंदोबद्ध रचना निसर्गत: अधिक अनुकूल असते. वरच्यासारखे विषय छन्दामध्यें रचणें अनवश्यक, किंबहुना अप्रयोजक आहे. तसले विषय व्यावहारिक भाषेंतच लिहिले पाहिजेत, आणि ते तसे लिहिले तरच त्यांचा व्हावा तसा उपयोग होतो.

आपल्याइकडे गद्यरचनेचा प्रचार प्राचीनकालापासूनच विरल आहे. आपले अतिप्राचीन ग्रंथ वेद होत. त्यांत व्यवहार, नीति, इतिहास, सृष्टिसौंदर्य, ललितकला, यज्ञादि क्रिया, धर्म, देवतावर्णनें, उपासना, ब्रह्मज्ञान असे विविध विषय आहेत. तरी त्या ग्रंथांची रचना छन्दोबद्ध आहे. पुढच्या बहुतेक संस्कृत ग्रंथकारांनीं आपल्या कृति प्राय: पद्यात्मकच करून ठेवल्या आहेत. वेदांविषयीं अत्यंत पूज्यबुद्धि असल्यामुळे त्या प्राचीन ग्रंथाच्या बाह्यांगाचें अनुकरण करण्याची इच्छा सदर ग्रंथकारांस झाली असावी असें वाटतें. धर्मशास्त्र, व्याकरण, तर्क, इतिहास, गणित, कोश इत्यादि विषय–कीं ज्यांचा छन्दोबद्ध रचनेशीं स्वभावत: विरोध–ते विषय देखील संस्कृतांत छंदांत रचिलेले आहेत ! ही छन्दाविषयींची प्रीति आश्चर्य करण्यासारखी आहे. आतां

छन्दोबद्ध रचना पाठ लवकर होते व त्यामुळें तिच्यांतील विषय ध्यानांतही धरण्यास सुलभ होतो ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाहीं. तथापि एवढ्या एकाच कारणास्तव सगळे विषय सरसकट पद्यांत ग्रथित करण्याची आवश्यकता आहे असें नाहीं. असो. संस्कृतांत कित्येक निबंध, भाष्यें, काव्यनाटकांवरील टीका, दशकुमार, कादंबरी इत्यादि ग्रंथ, गद्यात्मक आहेत. शिवाय चंपू, नाटक, भाण इत्यादिकांमध्येंही गद्याचें मिश्रण बरेंच आढळतें. तरी पण एकंदरींत संस्कृत वाङ्मय छन्दोबद्ध आहे असें म्हणावयाला हरकत नाहीं.

मराठी भाषा परंपरेनें संस्कृतापासून निघाली आहे. हिच्या उत्पत्तिकालाविषयीं मतभेद आहे. तथापि ही इसवीसनाच्या सातव्या शतकापासून प्रचलित आहे याविषयीं आधुनिक विद्वान् शोधक गृहस्थांची एकवाक्यता आहे. सातव्या शतकापासून ज्ञानेश्वरमहाराजांच्या कालापर्यंत जी ग्रंथरचना झाल्याचें प्रसिद्ध आहे, तीही बहुतेक पद्यात्मक आहे! ‘ बहुतेक ’ असें म्हणण्याचें प्रयोजन असें आहे कीं, ‘ लीलाचरित्र ’ या नांवाचा जो महानुभव-पंथी महंताचा ग्रंथ आहे असें अलीकडे प्रसिद्ध झालें आहे, तो गद्यात्मक आहे. तो अकराव्या शतकाच्या आंत बाहेर झाला असें म्हणतात. शांकरमताची स्थापना आठव्या किंवा नवव्या शतकांत झाली असें अनुमान आहे. तिचा परिणाम अन्यत्र झाला तसा महाराष्ट्रांतही झाला; आणि त्यामुळें अद्वैतसिद्धांताची छाप मराठी आद्यग्रंथांवर बसली, ही गोष्ट ओघानेंच झाली. परंतु मराठी ग्रंथकारांनीं तरी आपले ग्रंथ पद्यात्मक रचण्याचें प्रयोजन काय ? याचें कारण इतकेंच दिसतें कीं, ज्या संस्कृत वेदांतादि ग्रंथांशीं वरील मराठी ग्रंथकारांचा दृढ परिचय ते बहुतेक पद्यात्मक असल्यामुळें, त्यांच्यासारखाच वेष आपल्या ग्रंथांस असावा असें त्यांस वाटलें असावें.

यापुढें नामदेवापासून तों अनंतफंदीपर्यंत ह्मणजे अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत मराठी ग्रंथरचना बहुतेक पद्यात्मक आहे. आनंदतनय, रघुनाथ पंडित इत्यादिकांच्या काव्यांत गद्यरचना किंचित् चूर्णिकेच्या रूपानें दृष्टीस पडते. कटावाचा प्रकार कोणी गद्यांत गणतात. ही रचना अमृतराय वगैरे कवींनीं केली आहे.

वरील कालांतील मुख्य गद्य ग्रंथ ह्मटले ह्मणजे जुन्या बखरी व पत्रव्यवहार होत. यांपैकीं मागें ‘ काव्येतिहाससंग्रह ’ या मासिक पुस्तकांत प्रसिद्ध

झाले आणि कित्येक अलीकडे इतर मासिक पुस्तकांतून व अन्यत्रही प्रसिद्ध होत आहेत. अठरावें शतक उलटून जाईपर्यंत गद्यरचनेसंबंधानें इतकीच माहिती उपलब्ध आहे.

हल्लीं प्रचलित असलेल्या गद्यरचनेचें जनन गेल्या शतकाच्या द्वितीय चरणाच्या आरंभीं झालें. पहिला मराठी गद्य ग्रंथ इ० स० १८२६ त प्रसिद्ध झाला असें समजतें. ही गद्यरचना इंग्रजी अमलाबरोबर इकडे आली. त्याच्याबरोबर तीही प्रसार पावली. इंग्रजी शिकलेल्या पहिल्या पिढींतील कित्येक गृहस्थांनीं कांहीं इंग्रजी गद्यग्रंथ प्रथम मराठी भाषेंत उतरले. हे गद्यग्रंथ त्या वेळच्या मराठी शाळांतून वाचनपुस्तकें म्हणून चालू झाले. येथूनच गद्यलेखन व गद्यवाचन यांचा प्रसार मराठींत सुरू झाला. बाळशास्त्री जांभेकर, सदाशिव काशिनाथ छत्रे, हरि केशवजी, दादोबा पांडुरंग, महादेव शास्त्री कोल्हटकर इत्यादि गृहस्थांची मराठी गद्यरचना सुप्रसिद्ध आहे. त्यांतूनही छत्रे यांचीं 'बाळमित्र' व 'इसापनीति' हीं पुस्तकें तर फारच सरस साधलीं असून त्याची तारीफ अनेक मार्मिक विद्वानांनीं आजपर्यंत केली आहे. हीं पुस्तकें गद्यरचनेच्या दृष्टीनेंच केवळ उत्कृष्ट आहेत असें नाहीं, तर त्यांतील व्यवहार, नीति व बोध हीं केवळ अमोल आहेत. सदर ग्रंथांतील लेखनशैली अत्यंत मनोरम, सरळ व बालबोध आहे. हीं पुस्तकें आबालवृद्धांस अत्यंत प्रिय झालेलीं आहेत.

यानंतरच्या पिढींत परशुरामपंत गोडबोले, गोपाळराव हरि देशमुख, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादि बहुश्रुत व विद्वान् गृहस्थांनीं गद्यग्रंथ लिहिले. वर लिहिलेले तिन्ही गृहस्थ विशेष लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. त्यांच्याविषयीं थोडेंसें लिहितों. परशुरामपंततात्यांस इंग्रजी येत नव्हतें असें म्हणतात. यांनीं संस्कृताच्या आधारें मराठींत रचना केली आहे. यांचा प्रसिद्ध गद्यग्रंथ 'कादंबरीसार' हा आहे. बाणांच्या कादंबरीचें हें मराठी सार आहे. हा ग्रंथ फार प्रौढ, सरस व सरळ आहे. वरच्यांपैकीं दुसरे गृहस्थ रा० ब० देशमुख होत. हे गृहस्थ मोठे शोधक व बहुश्रुत होते. लेखनाच्या व व्याख्यानांच्या द्वारें त्यांनीं आपल्या माहितीचा लाभ आपल्या देशबांधवांस करून दिला. त्यांची लिहिण्याची पद्धत जुनी गृहस्थी डौलाची आहे, तिच्यांत पांचपेंच नाहींत; साधेपणा आहे. पण माहितीनें तिला सौंदर्य आलें आहे. प्रस्तुत: ग्रंथकाराचीं 'ऐतिहासिक गोष्टी,'

' पृथ्वीराज चव्हाण ' इत्यादि पुस्तकें अवश्य वाचण्यासारखीं आहेत. त्यांचे विविधविषयांवरील निबंधही प्रसिद्ध आहेत. त्यांवरून त्यांची भिन्न भिन्न विषयांवरील मतें कळून येतात. देशमुखांनीं आपली माहिती इंग्रजी ग्रंथ, मराठी बखरी व जुने कागदपत्र यांच्या आधारानें लिहिली आहे. यानंतर कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्याविषयीं दोन शब्द अवश्य लिहिले पाहिजेत. शास्त्रीबोवा अत्यंत बुद्धिमान् असून त्यांचें शास्त्राध्ययन जुन्या पद्धतीप्रमाणें झालें होतें. न्याय व अलंकार या शास्त्रांत ते निपुण होते. प्रौढ वयांत यांनीं इंग्रजीचा अभ्यास केला. मराठी, संस्कृत व इंग्रजी या तिन्ही भाषांत त्यांनीं प्रवीणता संपादन केली. यांच्या बुद्धीमध्यें सूक्ष्मपणा व व्यापकपणा हे धर्म विशेष होते. यांची कुशाग्र बुद्धि सर्व विषयांत सारखी चाले व त्यांतील वर्म त्यांस सहज समजे. त्यांचें वाचन फार विस्तृत असून त्यांचा विद्याव्यासंगही जबरदस्त होता. इंग्रजीमध्यें प्रवेश झाल्याबरोबर त्यांनीं आपल्या बुद्धिबलानें त्या प्रगल्भ भाषेंतील ज्ञानभांडार आपलेसें करून घेतलें; त्यामुळें त्यांस जो आनंद व लाभ झाला त्याचा अंश तरी मराठी वाचणारांस प्राप्त व्हावा अशा बुद्धीनें त्यांनीं मराठी ग्रंथरचना आरंभिली. यावरून त्यांच्या ग्रंथरचनेचा हेतु किती उदात्त होता हें दिसून येतें. शास्त्रीबोवांचे ग्रंथ प्रायः भाषान्तररूप आहेत. परंतु ते विद्वान् व नैयायिक भाषाभिज्ञ होते, यामुळें यांचीं भाषान्तरें मूलग्रंथांसारखींच सरस उतरलीं आहेत. इंग्रजी व मराठी या भाषांमध्यें सादृश्य नाहींच असें म्हटलें तरी चालेल यामुळें पहिलींतून दुसरींत बेमालूम तर्जुमा करणें किती अवघड आहे हें सहज लक्षांत येईल. तरी पण प्रस्तुत पंडिताचा या कामांत फारच मोठा लौकिक आहे. ' सॉक्रेतिसाचें चरित्र, ' ' रासेलस, ' ' अरेबियन् नाइट्स, ' ' अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह ' या त्यांच्या भाषांतररूप कृति आहेत. पण या इतक्या सुंदर उतरल्या आहेत कीं, इंग्रजीचा गंधही ज्यास नाहीं त्याला देखील त्यांतील रसाचा आस्वाद सहज घेतां येतो. ' अर्थशास्त्रपरिभाषा, ' ' व्याकरणावरील निबंध, ' व इतर कांहीं शास्त्रीय विषयावरील शालापत्रकांत प्रसिद्ध झालेले लेख, हे शास्त्रीबोवांच्या विद्वत्तेची, बुद्धिवैभवाची व विवेचकत्वाची साक्ष देतात. प्रस्तुत ग्रंथकारांत आणखीही एक गोष्ट विशेष होती. लक्ष्मी आणि सरस्वती यांचा स्वभावसिद्ध विरोध जसा प्रायः अनुभवास येतो, त्याप्रमाणें

विवेचकता व सहृदयता हे गुणही एकसमयावच्छेदानें एके ठिकाणीं आढळत नाहींत. परंतु कृष्णशास्त्री यांच्यामध्यें त्यांचा रमणीय संगम झाला होता. यामुळें त्यांच्या विवेचनपद्धतीला अपूर्व सौंदर्य आलें आहे. शास्त्रीबोवांची भाषा शुद्ध, प्रौढ, सरळ, सुरस व मनोहर आहे. तिच्यांतील शब्दयोजना अत्यंत मार्मिक आहे. मोठालीं समासघटित पदें त्यांच्या लेखांत प्राय: आढळत नाहींत. यामुळें त्यांच्या लेखांत प्रसाद फार. त्यांची विवेचनपद्धति सुबोध, मुद्देसूद, व्यापक व मनोवेधक आहे शास्त्रीबोवा शिक्षकही फार उत्तम होते. कठीण शास्त्रीय विषय देखील ते फार सोप्या व मनोरम भाषेंत समजावून देत, असें त्यांचे विद्यार्थी सांगतात; आणि हा त्यांचा असाधारण गुण त्यांच्या निबंधांतूनही पूर्णपणें दिसून येतो. विद्वत्ता, विद्याव्यासंग, रसिकता, पांडित्य, लेखनचातुर्य इत्यादि लोकोत्तर गुणांमध्यें कृष्णशास्त्री हे प्रसिद्ध आंग्लपंडित डॉक्टर जॉनसन् यांच्या तोडीचे होते, असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं.

इ. स. १८२५ पासून १८७५ सालापर्यंत जे गद्यग्रंथ झाले ते बहुतेक भाषान्तररूप आहेत या कालांत कांहीं वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकेंही उदयाला आलीं. 'शालापत्रक,' 'विविधज्ञानविस्तार,' व 'दंभहारक' हीं त्या वेळचीं गणनीय मासिक पुस्तकें होत.

यापुढचा म्हणजे १८७५ पासून आजमितीपर्यंतचा गद्यरचनेचा ओघ अंमळ वेगळ्या प्रकारचा आहे. नवीन विषय स्वतंत्र रीतीनें लिहिण्याची या कालांत सुरवात झाली. हिचे आद्य प्रवर्तक विष्णुशास्त्री चिपळूणकर हे होत. सहृदयता, लेखनचातुर्य व मार्मिकपणा हे वडिलांचे गुण विष्णुशास्त्री यांच्यामध्यें पूर्णपणे उतरले होते. यांना भाषाविषय व इतिहास यांची फार अभिरुचि होती. यांवरच यांनीं मोठा व्यासंग केला, तरी पण त्यांनीं इतर विषयांवरही थोडें-बहुत लिहिलें आहे. विष्णुशास्त्री यांचा मोठा ग्रंथ 'निबंधमाला' होय. प्रस्तुत ग्रंथांत त्यांच्या विचारांची स्वतंत्रता, रचनेची प्रौढी, सरसता, रमणीयता, इत्यादि अनेक गुण व्यक्त झाले आहेत. 'निबंधमाला' हा ग्रंथ विष्णुशास्त्री यांचें अक्षय्य स्मारक आहे. यांतील जॉनसनचें चरित्र, इतिहास, विद्वत्त्व आणि कवित्व, लोकभ्रम, इंग्रजी भाषा, विनोदमहदाख्यायिका, पुस्तकपरीक्षण इत्यादि

विषय वाचून मनन करण्यासारखे आहेत. त्यांपासून माहिती, रंजन व बोध होतो. शास्त्रीबुवांची भाषा सर्वत्र प्रसन्न, रमणीय व विलासशालिनी आहे. वडिलांच्या भाषेंत प्रायः न आढळणारा ओज हा गुण चिरंजीवांच्या रचनेंत विषयानुरोधानें आढळतो. विष्णुशास्त्री गुणग्राही होते. विदेशीय लोकांच्या अनुकरणीय गुणांची जागोजाग त्यांनीं तारीफ केलेली आहे. व स्वकीयांच्या अंगीं खिळलेल्या दुर्गुणांचा त्यांनीं उपहास केला आहे. जेथें जेथें कांहीं चांगलें दिसेल तें घ्यावें व आपली उन्नति करून घ्यावी या मुद्यावर त्यांचा मोठा कटाक्ष आहे. त्यांचे ग्रंथ वाचतांना ही गोष्ट सहज लक्षांत येते.

विष्णुशास्त्री यांच्या पश्चात् आज पंचवीस वर्षांत निरनिराळ्या विषयांवर थोडेबहुत ग्रंथ झाले आहेत. मासिक पुस्तकें व विशेषतः वर्तमानपत्रें यांनीं बरीच मजल मारली आहे. यावरून या काळांत गद्यरचनेचा ओघ अधिक विस्तृत व विचित्र झाला आहे हे दिसून येतें. चिपळूणकरांच्या पाठीमागें गोपाळराव आगरकर, बाळ गंगाधर टिळक, महादेव शिवराम गोळे यांच्यासारखे कांहीं नामांकित विद्वान् लेखक झाले आहेत. तथापि ज्ञानाच्या प्रत्येक शाखेंत स्वतंत्र व मान्य ग्रंथ होऊन गद्यरचनेला परिणतावस्था प्राप्त होण्याचा काल अद्यापि बराच दूर आहे असें वाटतें.

आपण मनांत विचार करितों तो शब्दमय असतो. ते शब्द छन्दोबद्ध नसतात. आपण नेहमीं बोलतों तसे असतात. ते शब्द आपण मुखानें किंवा लिपीनें व्यक्त करितों. यावरून मनुष्याचा विचार साहजिकपणें गद्यांत होतो असें म्हणावयाला हरकत नाहीं; आणि अशा दृष्टीनें पाहिलें असतां गद्यरचनेचा प्रारंभ म्हणजे विचारकालाचा प्रारंभ होय. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं असेंच मत ‘ निबंधमाले ’ त एके प्रसंगीं व्यक्त केलें आहे. यांत पुष्कळ अर्थ आहे. पद्यरचनेचा ( सामान्यपणें काव्याला पद्याचा वेष असतो म्हणून असें म्हटलें आहे ) प्रधान हेतु रंजन असतो; गद्यरचनेचा प्रधान हेतु ज्ञान असतो. पद्यांत थोडा तरी कृत्रिमपणा असणार, गद्यांत तो स्वाभाविकपणेंच नसणार. पद्यांत कल्पनांचें साम्राज्य, तर गद्यांत विचारांचें प्राबल्य. या गद्यपद्यांतील भेदावरून गद्याचें खरें महत्त्व वाचकांच्या ध्यानांत येईल.

पुणें, मार्च १९०७. **लक्ष्मण गणेशशास्त्री लेले.**

---

# अनुक्रमणिका.

## भाग दुसरा.

# गद्यरत्नसमुच्चय.



## भाग दुसरा.



### १. सृष्टिसुंदरीची दिवाळी !

शरदृतूचा एक महिना बहुतेक संपत आला आहे. श्रावणाची झड कधींच मागें पडली. भाद्रपदांतल्या हस्ताच्या जोरदार पण घटकेच्या सरीही गेल्या. त्याबरोबर काळेभोर ढग, त्यांत संचरणारी व डोळ्यांस दिपविणारी सोनसळी वीज व तिचा अनुचर मेघनाद, हेही लुप्तप्राय झाले. चार महिन्यांच्या पावसानें धूळ बसवून टाक-ल्यानें आकाश आपली सहजनीलकांति धारण करीत आहे. ती एखाद दुसऱ्या पिंजरलेल्या पांढऱ्या ढगानें जास्तच खुलत आहे. पावसाळ्यांत फुगलेल्या विध्वंस करणाऱ्या नद्या आतां आपल्या कक्षांत परत येऊन प्रसन्न होत्सात्या मंद मंद चालल्या आहेत. मैदानांतील शेतें पिकांनीं पूर्ण आच्छादिलीं आहेत, त्यांवर दृष्टि ठरत नाहीं. इकडे पिंवळीं ज्वारीचीं कणसें डुलत आहेत, तर तिकडे कापशीच्या डहाळ्या त्रिपुटी करीत आहेत. मधून मधून तुरीचे वाफे चमकत आहेत. तिळानें आपला खुळखुळा वाजवि-ण्यास आरंभ केला आहे. कोठें कोठें बाजरी आपलें हिरवेंगार

लहान लहान कांड्यांचें कणीस दाखवून डोळ्यांना रिझवीत आहे. तळ्याच्या कांठच्या सखल व पाणथळ शेतांत पिंवळें भात शाल्योदनाची आशा उपजवीत आहे. रब्बीच्या शेतांतील भूभाग कोमल गव्हांच्या रोपांनीं हिरवागार झाला आहे. क्वचित् हरभरा आपल्या पर्णांवर आम्लरस धरीत आहे. वनांतील पुष्पांनीं व फलांनीं लादलेले वृक्ष व लता डोळ्यांस व नाकास आनंद देत आहेत. त्यांच्या नानाविध आकृति, जाति, नांवें, रंग, रानांत संचरणारा भिल्ल, वनरक्षक किंवा उद्भिज्जशास्त्रवेत्ताच ओळखूं व सांगूं शकेल. वनांतून वाहणारे स्वच्छोदकाचे ओहोळ व त्यांच्या कांठीं असलेल्या वृक्षांवर बसलेले पक्षी आपल्या मधुर रवांनीं कानांस कितीतरी रंजवीत आहेत ! एका झाडावरून दुसऱ्या झाडावर, एका फुलावरून दुसऱ्या फुलावर उड्या मारणारे पतंग हेही आपल्या चित्रविचित्र पक्षांनीं डोळ्यांना किती तरी तृप्ति देत आहेत ! रानांतून हरणांचे कळप उड्या फेंकीत चालले आहेत, त्यांवर नजरही ठरत नाहीं. कुरणांत ताजें गवत खाऊन पुष्ट बनलेले वृषभ एकमेकांशीं टक्कर मारीत आहेत; कांहीं शिंगांनीं शेतांतील वारुळें व कांहीं वरोळ्या हुंदडीत आहेत. त्यांचे रक्षक गोपाळ झाडाखालीं कांबळीवर पडून स्वस्थपणें त्यांजकडे पहात आहेत अथवा झोंप घेत आहेत. मैदानाच्या पर्यंतभागीं असलेल्या टेंकड्याही या वेळीं आपलें सौम्य स्वरूप दाखवीत आहेत. असें हें शांत भुवनाचें चित्र किती तरी मनोहारि आहे !

परंतु आतां या वनश्रीचा दाता भगवान् सूर्यनारायण आपल्या औदार्याचें कौतुक करीत व डुलत डुलत आपल्या साम्राज्याचा

दुसरा भाग पाहण्याच्या उद्देशानें तिकडे निघून गेला ! त्याशीं नित्य वैर करणारी रजनी पुढें ठाकली ! सूर्यानें नटविलेल्या मनोहर कुसुम-वर्गाचा एकसहा लोप करून टाकण्याचा तिनें आव घातला; पण तो सर्वांशीं सिद्धीस गेला नाहीं. कारण त्याचा अति लांबचा बंधु-गण ज्या तारका त्यांनीं आपल्या करांनीं त्या वर्गास सांवरून धरिलें. नाहींतर रजनीनें जाई, नेवाळी, कुंद, पारिजातक यांचीं पांढरीं शुभ्र फुलें काळीं करून टाकिलीं असतीं. या काळीं चंद्रमा अगदीं उत्तर रात्रीं उगवत असल्यानें व तशांत तो विपन्न स्थितींत असल्यामुळें त्याला वनश्रीला फारसें उजळितां येत नाहीं. त्याचें मिणमिणीत तेज रजनीच्या भीतिप्रद अभावरूप अंधकारास दृश्य व उग्रतरच स्वरूप देतें.

अशा रात्रीं पक्षी आपापल्या नीडाच्या आश्रयानें पक्षांत चोंची खुपसून स्वस्थ निजले आहेत. दिवसाचा जीवनकलह कांहीं घटका विराम पावला आहे. गरीब शेतकरी आपल्या खोपटांत कृतश्रमांचें चीज दयाळू परमेश्वर कैक वर्षांनीं करीत आहे, असा धन्यवाद गाऊन मुलांबाळांसह खाटल्यावर पडला आहे. सावकार, पीकपाणी चांगलें येणार, सुबत्ता होणार, तेव्हां आपली थकलेली बाकी वसूल होईल अशा सुखकर स्वप्नाचा अनुभव घेत पलंगावर पडला आहे. आगगाडीहून लांब असलेल्या खेड्यांतील वाणीउदमी, आतां रस्ते खुले झाले, प्रांतोप्रांतांत जावयाला हरकत नाहीं, असें समजून पाव-साळ्यांत उकलून ठेवलेली गाडी सज्ज करून भावी फलाच्या आशेनें स्वस्थ निजला आहे.

अशा रमणीय व शांत ऋतूंत दिवाळीचा सण ज्या महात्म्यांनीं घातला त्यांच्या दूरदृष्टीचें कौतुक करावें तितकें थोडेंच! बाह्य सृष्टींत व मनुष्येतर जीवसृष्टींत प्रसन्नता व शांति नांदते, तेव्हां मनुष्यानेंही आपल्या चित्तांत प्रसन्नता व शांति धरावी, असा त्यांचा उदात्त विचार असावा असें दिसतें. शांति राहण्याला स्वच्छता पाहिजे, लक्ष्मी पाहिजे म्हणून पडलीं झडलेलीं घरें दुरुस्त करावीं, भिंती लिंपाव्या, सारवाव्या व रंगवाव्या, आंगण पाणी शिंपून स्वच्छ करावें, व त्यांत चित्रविचित्र रांगोळ्या घालून त्या रंगांनीं भराव्या, दारापुढें लांकडाचे खांब रोवून त्यांवर बांधलेल्या आडव्या फळ्यांवर व उभारलेल्या कमानींवर, किंवा घराच्या ओट्यावर व सज्जावर, रात्रीं दिवेच दिवे हारीनें लावावे, घरांतील कोणताही भाग, कोणतीही अडोशाची जागा, कोणतीही खोली, अंधारांत राहूं देऊं नका, कोठेंही केरकचरा असूं देऊं नका, अशी आज्ञापरंपरा घातली. हिचा हेतु हाच कीं, अशाच घरांत लक्ष्मी चिरकाळ नांदते, हा समज दृढ करावा. 'केरसुणीला पाय लागूं देऊं नये, कारण ती लक्ष्मी आहे.' असें बायका म्हणतात, यांतील इंगित हेंच. 'हात फिरे तेथें लक्ष्मी ठरे,' अशी दुसरीही म्हण याच अर्थाची आहे. धनतेरस आणि लक्ष्मीपूजन हीं या निमित्तेंच प्रचारांत आलीं.

घरांत जशी स्वच्छता असावी, तशीच देशांतही स्वच्छता असावी, म्हणून नरकचतुर्दशी आली; अंगाचा सर्व मळ जावा, दुर्गंधी जावी, एवढेंच नाहीं, तर अंगाचा सुवास आपणांस व इतरांस सुखकर व्हावा, म्हणून सुगंधि उटणीं व तेलें व अभ्यंगस्नान यांचा प्रघात पडला.

व्यवसायांत अश्रांत श्रम होतात. त्यांचा परिहार व्हावा म्हणून चार दिवस खेळीमेळींत घालवावे, असें योजिलें. सण म्हटला म्हणजे गोड पदार्थ आलेच, व नानाप्रकारचे गोड पदार्थ करण्यांत सुगरण-पणा दाखविण्याची संधी स्त्रियांना दिली. पुरुषांनीं ज्या त्या पदार्थांची वाखाणणी केली असतां कोणती घरधनीण आपणास धन्य मानून घेत नसेल ? गोड पदार्थांनीं मुलांची हौस पुरी होत नसेल, म्हणून त्यांना नाचायाला, बागडायाला व खिदळायाला लावावें, व तीं तशीं पाहून त्यांच्या आईबापांनीं आनंद मानून घ्यावा, म्हणून फटाक्यांची व निरनिराळ्या प्रकारच्या दारूकामाची योजना झाली. पन्नास वर्षां-पूर्वीं मुलांकरितां लंकेचा किल्ला करण्याचा व त्यावर तोफा, बंदुकीचे स्वार, वगैरे चढविण्याचा प्रघात फार असे; पण अलीकडे तो नष्ट-प्रायच झाला आहे. त्या वेळीं उर्वरित वीरश्रीचा तो द्योतक असे.

पुरुषांना व मुलांना दिवाळीचा सण आनंददायक तसाच स्त्रियां-नाही आहे. दसऱ्याच्या दिवशीं शमीच्या लगडी व आपट्याच्या पत्रांच्या पुतळ्या 'सोनें' म्हणून देऊन कशाबशा समजूत घातलेल्या मुलीबाळी, गृहपत्न्या, बहिणी, या दिवाळींत खऱ्याखुऱ्या सोन्याच्या पुतळ्यांची, निदान त्यांच्या अभावीं रौप्य मुद्रिकांची ओंवाळणी घेत-ल्यावांचून रहावयाच्या नाहींत. ही ओंवाळणी नव्या वर्षाची त्यांची बोहनी ( भवानी ) होय ! दर वर्षाच्या ओंवाळणीचा कुणगा प्रत्येक स्त्री जिवापलीकडे ठेविते, त्याला ती कोणाला हात लावूं देत नाहीं ! ज्याला बहीण नाहीं, तो पुरुष अभागी असें समजतात; म्हणून असा अभागी पुरुष आपल्या ओळखीच्या मुलीस अथवा स्त्रीस भाऊ-

बिजेपुरती कृत्रिम बहीण समजून तिला ओंवाळणी घालतो ! भाऊबिजेचें माहात्म्य आपल्या महाराष्ट्रांत विशेष आहे.

विष्णु मोरेश्वर महाजनी.

---

## २. कृष्णशिष्टाई.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं उठून नित्याप्रमाणें आह्निक आटोपून श्रीकृष्ण राजसभेला जावयास तयार झाला. इतक्यांत दुर्योधन व शकुनि त्यास भेटावयास आले. त्यांनीं धृतराष्ट्र राजसभेंत जाऊन बसला असें त्यास सांगितलें. तेव्हां ब्राह्मणांस हिरण्य, वस्त्रें व गाई दान करून श्रीकृष्णानें अग्नीस प्रदक्षिणा घातली व ब्राह्मणांस नमस्कार केला. मग गळ्यांत कौस्तुभमणि घातल्यानें अधिक देदीप्यमान झालेला श्रीकृष्ण, कौरवांच्या मंडळींतून, रक्षण करणाऱ्या यादवांसह, रथाजवळ आला आणि विदुरासह त्यांत बसून निघाला. श्रीकृष्णाच्या रथाचा जवळ आलेला आवाज ऐकतांच कौरवसभेंतील सर्व राजे आनंदानें व उत्सुकतेनें सभाद्वाराकडे पाहूं लागले. क्षणभरानें सर्व बलवानांचा व बुद्धिवानांचा अग्रणी जनार्दन सभेंत शिरतांच धृतराष्ट्रासहित भीष्मद्रोण उभे राहिले व त्याबरोबरच उत्थापन देणाऱ्या शेंकडों राजांच्या तलवारींचा खणखणखण आवाज त्या विस्तीर्ण सभेंत भरून गेला. श्रीकृष्णाकरितां धृतराष्ट्राजवळ एक रत्नखचित सुवर्णमंचक ठेविला होता. त्याजवर श्रीकृष्ण विदुरास घेऊन बसला. सात्यकीस दुःशासनानें आपल्या आसनावर जागा दिली. दुर्योधन व कर्ण एकाच आसनावर श्रीकृष्णापासून

थोड्याच अंतरावर बसले. याप्रमाणें सर्व लोक आपापल्या स्थानीं बसल्यावर श्रीकृष्णाचें भाषण ऐकण्यासाठीं ती राजसभा स्तिमित झाली. तेव्हां श्रीकृष्णानें धृतराष्ट्राकडे वळून बोलण्यास प्रारंभ केला. तो म्हणाला, " धृतराष्ट्रा, कौरवपांडवांचा स्नेह व्हावा व लक्षावधि वीरांचा प्राणनाश होऊं नये याविषयीं प्रयत्न करण्यासाठीं मी येथें आलों आहें. राजा, हें कौरवकुल सर्व राजकुळांत श्रेष्ठ असून श्रुत व वृत्त या सद्गुणांनीं सम्पन्न आहे. अशा या कुलात विशेषतः तुझ्या निमित्तानें हा भयंकर प्रकार घडूं पाहात आहे हें योग्य नव्हे. अंतर्बाह्य कोणत्याही रीतीनें या कुलांत मिथ्या आचरण करणाऱ्यावर तुझी सर्वथा सत्ता आहे. असें असतां तुझे दुर्योधनादि पुत्र धर्म आणि अर्थ या दोहींचा अनादर करून नृशंस वर्तन करूं पाहात आहेत हें काय ? याजपासून उत्पन्न होणारी आपत्ति कौरवकुळाचाच नव्हे तर सर्व पृथ्वीचा नाश करील. राजा, तुझ्या हातीं शम आहे. पांडव पराक्रमी आहेत. त्यांस तूं आपले करून घेतल्यास या कुरुराज्यावर देवसेनेसह इंद्र सुद्धां स्वारी करूं शकणार नाहीं; मग इतर राजांची काय कथा ? तर त्या पांडवांस समजावून व पूर्वीप्रमाणेंच आपल्या पोटाशीं धरून तूं सर्व पृथ्वीचें साम्राज्य भोग. युद्ध झाल्यास उभयपक्षीं क्षय होईल, यांत हित कोणतें ? पांडव रणांगणांत पडले किंवा तुझे पुत्र पडले, दोन्हीपक्षीं तुला काय मिळेल, हें मला सांग. राजा, हे पांडवही तुझेच आहेत, व हे पुत्रही तुझेच आहेत. यांचा तूं नाश करूं नकोस. तूं जर आपल्या प्रकृतीवर स्थिर राहशील तर सर्व गोष्टी साधतील. तूं पांडवांवर पूर्वीं जें प्रेम केलेंस तेंच तूं आज मृत्यूच्या समीप आला असतां कर आणि कौरव-

पांडवांचा संधि घडवून आण. हे जमलेले राजे एकमेकांस आनंदानें भेटून एके ठिकाणीं पानभोजन करून शांततेनें आपापल्या देशांस जाऊं दे. यांत तुझा धर्म आणि अर्थ या दोहोंचें रक्षण होईल. धृतराष्ट्रा, पांडवांनीं तुझा प्रसाद मागून विनंति केली आहे, 'ताता, तुझ्या आज्ञेनें आम्हीं सर्व दुःखें निमूटपणें सोशिलीं. आमचा ज्येष्ठ पिता आपलें वचन वनवासाअंतीं खचित पाळील, या भरंवशावर आम्ही आपल्या समयाबाहेर वागलों नाहीं. याजबद्दल हजारों ब्राह्मण साक्ष आहेत. तर आम्ही वचन पाळीत आहों, त्याप्रमाणें तूं पाळ आणि आम्हांस आमचा राज्यांश दे. ' या राजसभेलाही पांडवांची हीच विनंति आहे. तुम्ही सर्व धर्मज्ञ आहां. या सभासदांच्या समक्ष, जर अधर्मानें धर्माचा, असत्यानें सत्याचा, नाश होईल तर तें पातक सभासदांस लागेल. यासाठीं जर माझें वचन कोणत्याही रीतीनें अयोग्य असेल तर तुम्हीच सांगा. धृतराष्ट्रा, या सर्व राजे लोकांस मृत्युपाशापासून तूं सोडीव, व क्रोधाचा आश्रय न करितां शमाचा आश्रय कर. मी पांडवांचेंच नव्हे, तर सर्वांचेंच श्रेय इच्छितों. अर्थाला अनर्थ समजून व अनर्थाला अर्थ मानून अतिलोभास गुंतलेल्या या तुझ्या पुत्रांचा तूं निग्रह कर. तूं सांगशील तें ऐकण्यास पांडव तयार आहेत. तूं तसेंच म्हणशील तर ते युद्धासही तयार आहेत. यासाठीं या वेळीं जें अत्यंत युक्त आहे, तें तूं कर. असें माझें तुला कळकळीचें सांगणें आहे. ”

चिंतामण विनायक वैद्य.

---

## ३. वाचनाचें महत्त्व.

वाचनापासून प्राचीनकाळच्या किंवा सांप्रतच्याही मोठमोठ्या विद्वद्वरांशीं, कविवरांशीं, इतिहासकारांशीं, कादंबरीकारांशीं व शास्त्रतत्त्ववेत्त्यांशीं आपला दृढ परिचय होतो. जे, आतां कांहीही केलें तरी कधींही आपल्या दृष्टीस पडावयाचे नाहींत, ते आज चार आठ आण्यांत, फार तर रुपया दोन रुपये किंमतींत आपल्या घरीं दारीं पाहिजे तेथें आपली गांठ घेतात. फक्त वाचतां मात्र आले पाहिजेत. मोठमोठे ग्रंथकार हे अति उत्तम व नाजूक अशा वाद्यां-सारखे आहेत. जो वाचनकलानिपुण आहे त्याला ते त्याच्या कले-प्रमाणें उत्तरें देतात. तो जर फार छेडून विचारील तर त्याला समा-धानकारक उत्तरें ते देतातच. ज्याप्रमाणें एखादा उत्तम बीनकार बीनांतून हवे ते बोल काढतो व त्या ब्रह्मानंदांत तल्लीन होऊन जातो, त्याप्रमाणेंच उत्तम वाचणारा उत्तम ग्रंथकारापासून आप-ल्याला आनंदकारक बोल काढतो. चंदन जितकें घासावें तितकें सुगंध अधिक देतें, तद्वत् कालिदास, शेक्सपिअर, व्हिक्टर ह्यूगो, डांटे इत्यादि ग्रंथकारांचें आहे. केव्हां केव्हां ते नवजलधराप्रमाणेंही वर्तन करितात. म्हणजे नवजलधर ज्याप्रमाणें सर्वांस पाणी देतो त्याप्रमाणेंच हे आपलें ज्ञानामृत त्या सर्वांस पाजतात. जो एखादा हतभाग्य घुबडाप्रमाणें झाडाच्या ढोलींत सत्तावीस फूट खोल बसेल त्याला सूर्य तरी काय करणार आणि कोण काय करणार ? परंतु जो प्रकाशाची इच्छा धरील त्यास चंद्रसूर्य प्रकाश देतातच. वर सांगितल्याप्रकारचे ग्रंथकारसूर्यही वाचननिष्णातांस ज्ञानप्रकाश दिल्याखेरीज कधीं राहत नाहींत. दुसरी मौज ही कीं, ते

शरीरानें मृत, परंतु त्यांनीं आपलीं अन्तःकरणें आमचे स्वाधीन करून ठेविलीं आहेत. कालिदास, रघुवंशाचा इतिहास, शकुंतलेचें पुण्यचरित जर आपल्या मधुर मधुर अशा वाणीनें आम्हांस पाहिजे त्या वेळीं व पाहिजे तेथें सांगतो आहे तर त्यास मृत असें म्हणावें तरी कसें? आपलीं छत्तीस सदतीस नाटकें देऊन मनुष्यमात्राच्या अन्तःकरणांतील खडान्‌खडा माहिती जर शेक्सपिअर देतो आहे तर त्याचें प्रेत ॲव्हन नदीच्या कांठीं पुरलें आहे म्हणून शोक करावा कशाला? मनु आपलें ज्ञान केव्हां पाहिजे तेव्हां सादर करितो आहे, तर त्याला प्राचीन असें म्हणावें कोणीं! वाचनप्रिय मनुष्यानें क्षणभर आपल्या सभोंवार पाहिलें, तर त्यास काय बरें दिसणार आहे? कोठें शेक्सपिअर आपलीं सर्वमान्य नाटकें पुढें करून प्रास्पेरोच्या गुहेंत नेऊन पिशाचें व जादू पाहण्यास, अगर डेन्मार्कमध्यें नेऊन हॅम्लेटची दुरवस्था पाहण्यास, लागलींच मनुष्यद्वेष्ट्या टैमनचे उद्गार ऐकण्यास व क्षणानें डेस्डिमोना, ज्युलियेट इत्यादिकांचें निर्व्याज प्रेम पाहण्यास, विनंति करीत आहे. पलीकडे कालिदासानें एकमेकींस विनोदपर भाषणें बोलणाऱ्या सख्यांसह शकुंतला उभी केलीच आहे. भवभूति सीतारामांचे व मालतीमाधवांचे प्रेमोद्गार ऐकविण्यास तयार आहेच. तिकडे अर्वाचीन काळचा शेक्सपिअरच जो व्हिक्टर ह्यूगो तो तीनशें वर्षांपूर्वींचा स्पेन देशाचा मानीपणा व सत्यप्रियता हीं दाखवावयाला अगदीं उत्कंठित आहे. त्याचप्रमाणें दुसऱ्या नेपोलियननें केलेल्या अनन्वित कृत्यांचें वर्णनही पाहण्यास सांगत आहे. तिकडे मॉन्टेनही गप्पा सांगण्यास बसला आहे. हवी ती गोष्ट त्याच्याजवळ काढा

तो तुम्हांला कांहींना कांहीं तरी नवें ज्ञान देणारच. रोमचा उत्कर्ष व अपकर्ष कसा झाला, हें सांगण्यास गिबननें आपला इतिहास पुढें केला आहे. ग्रीस देशाचा इतिहास ग्रोट घेऊन उभा आहेच. मन थोडेंबहुत दुःखित झालें असल्यास मोलिएर हंसवून आनंदित करणार. जॉन् स्टुअर्ट मिल्लसारखे तत्त्ववेत्ते बुद्धिवाद करण्यास या, असें म्हणत आहेत. जे विचार आणखी दोनतीनशें वर्षांनीं सर्व-साधारण होतील असे विचार आपल्या अर्थगांभीर्यानें ओथंबलेल्या कवितेच्या द्वारें शेली तुम्हांपुढें ठेवीत आहे. असे एक कीं दोन! हवे तेवढे महात्मे वाचनप्रिय माणसांची सेवा करण्यास तयार आहेत. बिचाऱ्यांनीं आपल्या बायकामुलांशीं आनंदानें घालवावयाचा वेळ आम्हांसाठीं कष्टांत घालवून एवढाले प्रचंड उदात्तरमणीय ग्रन्थ निर्माण केले! परंतु आम्ही कसले कृतघ्न! ते उघडण्याचे देखील कष्ट घेत नाहीं! केव्हां केव्हां आपणांस आळस पछाडतो व आपल्या उद्योगित्वाचा खग्रास करितो त्या वेळीं सहज जरी यांचेकडे वळलें तरी केवढा बरें फायदा होतो! त्यांतला एखादा चट्‌कन् सांगतो, "बाबारे, एका ईश्वराखेरीज रिकामपण कोणासही नाहीं." दुसरा म्हणतो, "या पृथ्वीवर मनुष्याला कां उत्पन्न केलें आहे? उद्योगासाठीं, समजलास!" तेव्हां वाचनापासून उपदेशप्राप्ति हाही एक फायदा आहे. त्याचप्रमाणें आपल्यास नवे नवे विचार सुचतात हा केवढा फायदा आहे! मागील लोकांचें ज्ञान मिळालें म्हणजे नवीन गोष्टींचें ज्ञान सम्पादन करण्यास व आपल्या पुढील पिढीस तें देण्यास आपल्यास सोपें जातें. असें नवीन ज्ञान संपादून पुढील लोकांस तें पोंचतें करणें हें आपलें

कर्तव्य–इतकेंच नव्हे, फार जबाबदारीचें कर्तव्य–आहे. जो तसें करीत नाहीं तो पिढीजाद संपत्तीचा अपव्यय करणारा होय. ज्याला आपलें ज्ञान पुढील लोकांस द्यावयाचें आहे, त्याला मागचें ज्ञान संपादलेंच पाहिजे. त्याखेरीज त्याला आपलें कर्तव्य योग्य तऱ्हेनें करतां येणार नाहीं. आजपर्यंत जे जे मोठाले ग्रंथकार झाले, ते ते मागील ज्ञानाच्या मदतीवांचून झाले नाहींत. विचारास तर वाचनाखेरीज गत्यन्तरच नाहीं. अन्न खाल्लें नाहीं तर जठरांत पचन होणार कशाचें ? वाचन नसेल तर विचार करणार कशाचा ?

हरि नारायण आपटे.

---

## ४. इतिहास आणि चरित्र.

इतिहासामध्यें एका किंवा अधिक देशांचा व बऱ्याच मोठ्या कालाचा वृत्तांत सांगितलेला असतो. चरित्रामध्यें एकाच पुरुषाच्या आयुष्यांत घडलेल्या वृत्तांताचें निवेदन केलेलें असतें.

इतिहास आणि चरित्र हीं दोन्ही मनोरंजक आणि बोधप्रद असतात. प्रत्यक्ष अनुभवानें आपणांस नेहमींच शहाणपण येत असतें. काय काय श्रम केल्यामुळें आपण सुखी झालों, व काय काय चुका केल्यामुळें आपण दुःखी झालों, ह्याचें मनन केलें असतां आपण शहाणे होतों, हें कोणीही कबूल करील. परंतु हा शहाणपणा आपणांला फुकट मिळालेला नसतो. सुख मिळविण्यासाठीं

आपणांस मेहनत पडलेली असते, व आपल्या हातून घडलेल्या चुकांचे दुःखकारक परिणाम आपणांस भोगावे लागलेले असतात. म्हणून आपणांस आपल्या आयुष्यांत आपल्या स्वतःच्या अनुभवानें मिळालेलें शहाणपण कितीही मूल्यवान् असलें तरी तें सुखानें मिळालेलें नसतें. परंतु इतिहास किंवा चरित्रें ह्यांच्या वाचनापासून मिळालेलें शहाणपण हें मूल्यवान् असून शिवाय मनोरंजक असतें. कारण जीं संकटें एकाद्या देशाला किंवा पुरुषाला भोगावीं लागलेलीं असतात, त्यांचे प्रत्यक्ष वांटेकरी आपण नसतों. इतिहासांत किंवा चरित्रांत निवेदिलेल्या गोष्टी नानाविध व उत्कंठाजनक असून त्या वाचण्याकडे आपलें मन आकृष्ट होतें, व तेणेंकरून आपलें रंजन होतें. मनोरंजन व ज्ञानप्राप्ति, हीं दोन्हीं आपणांस एकदम प्राप्त होतात.

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें मनोरंजन आणि ज्ञानप्राप्ति होते, ह्या संबंधानें इतिहास आणि चरित्र हीं दोन्हीं सारखींच आहेत. तथापि इतिहास आणि चरित्र या दोहोंपासून सारख्याच प्रमाणांत किंवा सारख्याच प्रकारच्या लोकांस मनोरंजन व ज्ञानप्राप्ति हीं होतात असें मात्र नव्हे. इतिहास हा मोठ्या जनवृंदाची हकीकत देतो, त्यामुळें आपलें लक्ष एकदम शेंकडों व्यक्तींवर विभागलें जातें. चरित्राचा विषय एकच व्यक्ति असल्याकारणानें आपलें लक्ष त्या एकट्याच व्यक्तीवर लागलेलें असतें. आपली अनुकंपा व प्रेम हीं त्या एकाच व्यक्तीवर जडलेलीं असल्यामुळें त्या व्यक्तीची हकीकत आपल्या हृदयांत नीट ठसते; आणि तेणेंकरून ती आपणांस जास्ती मनोरंजक वाटते, व तिच्यापासून घ्यावयाचा बोधही मनामध्यें चांगला बिंबतो. आपण नेहमीं असें पाहातों कीं,

आपण एकाच वेळीं पुष्कळ गोष्टी करूं लागलों असतां कोणतीच गोष्ट घड होत नाहीं. परंतु एकाच वेळीं एकच गोष्ट आपण हातीं घेतली असतां ती चांगली साध्य होते. त्याचप्रमाणें इतिहासवाचनापासून होणारें मनोरंजन व होणारा बोध ह्यांचा अनेक व्यक्तींशीं संबंध असल्यामुळें त्याचें स्वारस्य व स्थायिकपणा हीं कमी प्रमाणांत असतात. चरित्राचा नायक हा आपल्या विचारांचा एकच केंद्र झाल्यामुळें आपणांस इतिहासवाचनापेक्षां चरित्रवाचन जास्ती गोड वाटतें, व तज्जन्य बोधही जास्ती वेळ टिकणारा असतो. चरित्रनायक हा आपल्याचसारखा सामान्य पुरुष असतो. आपल्याचप्रमाणें त्याला संसारांत अनेक प्रकारच्या अडचणी, व विविध संकटें आलेलीं असतात. त्यांचें निरसन त्यानें कसें केलें, तो कोणकोणच्या उपायांनीं वैभवास चढला, वगैरे गोष्टी आपणांस कळतात, व जें त्याला करतां आलें तें करणें आपणांसही शक्य आहे, हें तत्त्व आपल्या मनावर चांगलें ठसतें, आणि सहजच आपण त्या व्यक्तीचें अनुकरण करण्यास प्रवृत्त होतों.

आणखीही एका बाबतींत इतिहासाच्या वाचनापेक्षां चरित्राचें वाचन हें आपणांस लाभप्रद असतें. इतिहासानें राजनीतीचीं तत्त्वें आपणांस समजतात. चरित्रानें व्यक्तिनीतीचीं तत्त्वें मनावर ठसतात. इतिहास हा मुत्सद्यांच्या उपयोगीं पडण्याजोगा असतो. परंतु चरित्र हें प्रत्येक मनुष्याला उपयोगी असतें. समाजांतील एकाददुसराच मनुष्य मुत्सद्दी असावयाचा, परंतु व्यक्तिनीति ही प्रत्येक मनुष्यास प्रत्येक व्यवहारांत अनुसरावयाची असते. शिवाय असें कीं, मुत्सद्दीपदावर मनुष्य असतां जीं नीतितत्त्वें तो अनुसरत असतो, तीं

खोटीं किंवा भ्रामक, आणि डोळ्यांत धूळ टाकणारीं आहेत, असें तो अंतःकरणांत जाणत असून सुद्धां त्यांचें समर्थन करीत असतो; परंतु तोच मनुष्य आपल्या खाजगी व्यवहारांत तसल्या नीतितत्त्वांचें अवलंबन करावयाला कचरतो. सारांश हा कीं, इतिहासाच्या वाचनापासून जीं तत्त्वें आपल्या मनावर ठसतात, तीं खोटीं नसलीं तरी फार थोड्या मनुष्यांस उपयोगीं पडणारीं असतात आणि चरित्राच्या वाचनापासून आपणांस खऱ्या आणि शुद्ध नीतीचीं तत्त्वें समजतात. इतिहासांत ज्या पुरुषांनीं मोठमोठे पराक्रम केले म्हणून सांगितलेलें असतें, त्या सर्वच पुरुषांची नीति ग्राह्य किंवा अनुकरणीय असते, असें नव्हे. इतिहासामध्यें खोट्या नीतितत्त्वांच्या जोरावर एकादा पुरुष किंवा देश वैभवशाली झाला असें आपण वाचिलें, म्हणजे त्या खोट्या नीतितत्त्वांविषयीं आपणांला फारशी किळस वाटत नाहीं. परंतु खाजगी व्यवहारांत जरी कोणी मनुष्य खोटद्या नीतितत्त्वांचें अनुकरण करून वैभवशाली झाला असला, तरी त्याचें चरित्र वाचून आपणांस त्याचें कौतुक वाटेल असा संभव नसतो.

सारांश हा कीं, इतिहास आणि चरित्र हीं दोन्ही मनोरंजक व बोधप्रद असतात; परंतु सारख्याच प्रमाणांत नसतात.

विद्याधर वामन भिडे.

------

## ५. गृहाचें सौभाग्य.

लहान माणसें मोठ्या माणसांच्या आज्ञा पाळतात, मोठीं माणसें लहान माणसांचें कल्याण करितात; सगळीं माणसें एकमेकांवर मनापासून प्रेम करितात, सगळीं माणसें नेहमीं खरें बोलतात; सगळीं माणसें नेहमीं सत्याचरण करितात; सगळीं माणसें एकमेकांस संतोष करण्यास झटतात; सगळीं माणसें अंतःकरणपूर्वक देवाची भक्ति करतात; दया, क्षमा आणि शांति ह्यांची वसति पुष्कळ आहे; काम, क्रोध, मद, मत्सर इत्यादिकांस थारा नाहीं; हेवा, द्वेष, कुवासना इत्यादिकांची सावली देखील पडत नाहीं; एका माणसास सुख झालें म्हणजे तें सर्वांस होतें; एकाच्या पायास कांटा लागला कीं, सगळ्यांच्या डोळ्यांस पाणी येतें; बोलावयाचें काय, तर सत्य; वाचावयाचें काय, तर सच्चरित; गावयाचें काय, तर परमेश्वरगुणानुवर्णन, आणि करावयाचें काय, तर धर्मशास्त्रानें जें काय अत्यंत पवित्र म्हणून सांगितलें आहे तें. इतक्या गोष्टी ज्या ठिकाणीं घडतात, तेंच घर होय; आणि अशा ठिकाणीं राहणारीं जीं माणसें असतात त्यासच कुटुंब म्हणावें. या गोष्टीचा अभाव झाल्यावर एखाद्या ठिकाणीं इतर कितीही चांगल्या आणि सुखदायक गोष्टी असल्या, तरी तें घर नव्हे; तें अरण्य होय. आणि असें सद्गुणांचें राज्य ज्या माणसांत नाहीं, त्या माणसांस कुटुंब म्हणूं नये. गुरें म्हणावें, जनावरें म्हणावें. याप्रमाणें चांगलीं माणसें वागत आलीं आहेत. दाशरथी राम अयोध्या सोडून निघाले,ते कां, तर कुटुंबामध्यें मत्सराचें प्राबल्य झालें. भरतानें राज्यत्याग केला; तो

कां, तर त्यांत प्रेम नाहींसें झालें. धर्मराजानें राजधानी सोडली; ती कां, तर राज्यांत सापत्नभाव आणि दुष्टावा अतिशय माजला; म्हणजे रामचंद्रास घर हें अरण्य वाटूं लागलें ! तसें धर्मराजास आप्तांत राहणें हें अरण्यवासापेक्षां दुःखद वाटूं लागलें. हे दोघेही महात्मे स्वधामें सोडून अरण्यांत गेले. तेथें त्यांजपाशीं राज्यलक्ष्मी नव्हती, दारिद्र्य होतें; तरी सत्यप्रेम पुष्कळ होतें. त्याच्यायोगानें त्यांस अरण्येंही स्वगृहापेक्षां अधिक सुखप्रद वाटलीं. सीतेनें अरण्यांतील स्थिति आपल्या बहिणीस सांगितली आहे:—

## आर्या.

**चालति माझ्या मागें लक्ष्मणजी काननीं पुढें स्वामी,**
**धामीं तशीच हर्षे धालें पाहोनि आपुल्या स्वामी १**

मोरोपंत.

## अभंग.

**लक्ष्मण भावोजी मागें पुढें स्वामी । मज आहें धामीं ऐसें वाटे १**
**न बाधेचि मज उष्ण क्षुधा तृषा । तुम्हांपाशीं मृषा न बोलावें २**
**जेव्हां राहीं वाटे चालतां मी मागें । मुरडोनी मागें विलोकिती ३**
**बाई काय सांगों स्वामींची ती दृष्टी । अमृताची वृष्टी मज होय ४**

मोरोपंत.

त्याचप्रमाणें पांडव द्वैतवनांत रहात होते, त्याचें वर्णन केलें आहे:—

## आर्या.

**सरला वनवास मग द्वैतवनीं पांडुनन्दन वसति ते.**
**दिवसांत वांकुल्या शत दावित होतेचि नन्दनवसातितें १**

मोरोपंत.

पांडवांस द्वैतवनामध्यें नंदनवनापेक्षांदेखील अधिक सुख होत होतें, असें या म्हणण्याचें तात्पर्य आहे. सारांश असा आहे कीं, सदाचरण हें सगळ्या सुखाचें स्थान आहे, म्हणून घर हें जर सुखावह करावयाचें आहे—आपल्या घरांत आपणांस सुख व्हावें अशी जर इच्छा आहे–तर तें घर सदाचरणाचें वसतिस्थान करावें.

मनुष्यास घरासारखें दुसरें सुस्थल नाहीं. घर हें मोठें पुण्यक्षेत्र आहे. त्यांत मातापितरें ह्या देवता होत. त्या देवता सुप्रसन्न असल्या म्हणजे मनुष्यास कांहीं उणें पडत नाहीं. सगळे मनोरथ पूर्ण होतात.

मनुष्याच्या आंगच्या सद्‌गुणांस आरंभ होण्याचें आदिस्थान घर होय. सद्‌गुण संपादण्यास घरासारखें दुसरें ठिकाण नाहीं. घरांतलीं सगळीं माणसें संबंधी असतात. कोणाचा संबंध जवळचा असतो; कोणाचा दूरचा असतो. कोणी श्रेष्ठ असतो, कोणी बरोबरीचीं असतात. कोणी कनिष्ठ असतात. कोणी खोल असतात, कोणी उघड्या मनाचीं असतात. कोणी आर्जवी असतात, कोणी उद्धट असतात. अशा सगळ्या प्रकारच्या माणसांशीं वागण्याचा प्रसंग मनुष्यास घरामध्यें येतो. त्यांशीं वेगळ्या वेगळ्या प्रकारें कसें वागावें, कोणाला संतुष्ट कसें करावें, हें त्याला शिकतां येतें. आत्मसंयमन करणें, जगाचे आघात सोसणें, परोपकार करणें, दुसऱ्याच्या अपराधांची क्षमा करणें, दुसऱ्याच्या आंगचे गुण दाखविणें, आत्मस्तुतीची इच्छा दाबणें, इत्यादि सद्‌गुणांचा आरंभ होण्याचें स्थान घर असतें. कां कीं, इतक्या वेगळ्या वेगळ्या प्रकारच्या माणसांशीं

वेगळ्या वेगळ्या पर्यायांनीं वागावें लागतें. आणि त्यांत विशेष हें कीं, त्या शिकण्यामध्यें जरी क्वचित् एकादी चूक झाली, तरी तिचा परिणाम भयंकर होत नाहीं. ती चूक सुधारतां येते. हीच चूक परक्याशीं वागण्यांत झाली, तर ती सुधारतां येत नाहीं. तिचे परिणाम टाळतां येत नाहींत; आणि ते कदाचित् टाळतां आलेच, तर त्यास मनस्वी प्रयास पडतात. यास्तव आम्ही असें म्हणतों कीं, घर हें सद्गुण शिकण्याची एक अत्युत्तम शाळा आहे. तिची बरोबरी इतर कोणत्याही ठिकाणाच्यानें करवणार नाहीं.

त्याचप्रमाणें, कविश्रेष्ठ मोरोपंत ह्यांनीं जें म्हटलें आहे कीं, मनुष्यांच्या अपराधांवर इतरांनीं कितीही पांघरूण घातलें, तरी तें "थिटें" पडतें; पण आईच्या कृपेचें पांघरूण पुरून उरतें. तीच गोष्ट घराविषयीं आहे. मनुष्याच्या आंगचे दोष झांकण्यास घरासारखें दुसरें पांघरूण नाहीं. त्या कार्यास एवढें थोरलें आकाश तेंही "थिटें" होतें. पण घर पुरतें. दुष्ट मनुष्याला घर नकोसें होतें. पण घरास कधीं दुष्ट मनुष्य नकोसें होत नाहीं. दुष्ट माणसांनीं आपलीं घरें जाळलीं आहेत, पण घरांनीं कधीं दुष्ट माणसांस जाळलें नाहीं. घर हें खरोखर पुण्यक्षेत्र आहे. तेथें पाप असें कधींही होत नाहीं. अथवा उलट पर्यायानें आम्ही असें म्हणतों कीं, पाप होतें तें ठिकाण खरोखर घरच नव्हे, असें होतें.

तर मग मनुष्यास सुख होण्यास पाहिजे तें घर कसें असावें हें वर सांगितलेंच आहे. तसें तें बांधण्याचा प्रयत्न कुटुंबांतल्या प्रत्येक माणसानें आपापल्या परी केला पाहिजे, म्हणजे आपआपलीं कर्तव्यें

केलीं पाहिजेत. त्यास संपत्ति लागत नाहीं, तसे मोठे प्रयासही पडत नाहींत. त्याची सामग्री विधात्यानें माणसाच्या अन्तःकरणांत सिद्ध करून ठेविली आहे. ती यथायोग्य प्रकारें बाहेर काढून तिचा उपयोग यथायोग्य रीतीनें करणें, एवढेंच काय तें माणसाकडे आहे.

विनायक कोंडदेव ओक.

---

## ६. खार आणि साप यांचें शब्दचित्र.

या खारीसारखा सुबक, आनंदी आणि गमतीचा दुसरा प्राणीच नसेल अति हूड असून अत्यंत निरुपद्रवी. खाण्यापिण्यांतही कोणा जीवाची प्राणहानि नाहीं. मांजराचे पिलासारखी खेळकर, परंतु निर्दय नाहीं. शाखामृगाहूनही अधिक चलाख, पांखरांपेक्षां मनोहर आणि तजेलदार, आणि वनदेवतेचें आवडतें खेळणेंच असली ही लुकलुक डोळ्यांची गोजिरवाणी मूर्ति एका वृक्षशाखेवरून दुसरीवर जाते, तेव्हां विजेची चपळाई कमी असा भास होतो ! तिच्या गति तरी किती विचित्र ! क्षणांत टुणकन् उडी मारील, क्षणांत तिरासारखी धांवत जाईल, क्षणांत मध्येंच मुरडेल, त्याचा कांहींच नेम नाहीं. सारी लहर आहे ! हरिणाहून चपळ, वाघाहून अधिक टिपण झोंकदार. देहांत सरळपणा पहाल तर मुळींच नाहीं, पण जिनगरी बाहुलीपेक्षां अधिक मोहक आणि सावरीचे कापसापेक्षांही गुलगुलीत. अंगीं ऐट किती, मुरड किती, नखरा किती, आणि वात्रटपणा तरी किती ! पळांत तुमचे मागें धांवेल, पळांत दृष्टिआड

लपेल, पळांत वर डुकली उचलून तुम्हांला हेरील, क्षणांत प्रियसखी-प्रमाणें हळूच कान देऊन चोरून ऐकत बसेल ! कोण खेळाडू, कोण धूर्त, कोण दिमाखदार, किती रंगाढंगाची ! छे, छे, मला वाटतें स्वर्गींची अप्सराच हें मुरकेदार छोटेंछबेलें रूप घेऊन बाळ-गोपाळांच्या मौजेकरितां भूलोकीं अवतीर्ण झाली आहे !

ओहो ! तो पहा, वितळलेल्या रुप्याचा छोटासा ओघळ जमिनी-वरून चालला आहे ! चालला आहे कशाचा ?—वाहतो आहे. कारण त्या चालण्यांत यत्न किंवा कष्ट कसे ते नाहींत. गति किती गमतीची ? चपळ असून शांत. पाण्याची लाट कीं वाऱ्याची झुळूक ! पुनः लाट म्हणावी तर गर्जत नाहीं, ओघ म्हणावा तर धबधबा नाहीं. सर्व शरीर एका वेळीं गतींत असूनही कांहीं भाग या कलावर झुकलेला, कांहीं उलट कलावर, निम्मे सरळ पुढल्या झोकावर व निंमे मागें मुरडलेला. तथापि कोणत्याही भागाला फाजील संकोच नाहीं, फाजील ताण नाहीं, सर्व शरीर सारखें एक तोलांत चाललेलें. गोंगाट नाहीं. बोभाट नाहीं. टिकल्यांच्या चंद्रहाराचा सर घसरतो आहे, कीं सुबक बुंदक्यांचा गळपट्टा पडला आहे, कांहीं ओळखत नाहीं. रेशमाहून मृदु, कदलीगर्भाहून शीतल, पुष्पहाराहून सुखतर स्पर्श ! पण या सौम्यपणाला फसूं नका. दाढेंत जिवंत मृत्यु उभा आहे. थोडें वाटेस जा, म्हणजे समजेल चंद्रहार कीं कट्यार, आणि गळपट्टा कीं गळा उतरणारा पट्टा आहे तो ! रुपेरी पाण्याचा ओघळ आतां नव्हे. आतां झाली विषाची लाट. गवताचे गर्दींतून ह्वा विषारी बाण सणसणतो आहे. क्रोधानें इतका दुमडला आहे

कीं, श्वास घेण्याला फुरसद नाहीं. नुसता फणकारा चालला आहे. आतां त्याला शीत नाहीं, उष्ण नाहीं. पुष्पाचें मृदुत्व जाऊन पाषाणाचें कठोरपण उभें राहिलें आहे. अखिल ब्रह्मांडांतील क्रूरता, दुष्टपणा, हिंस्रता एकवटून तुमचेपुढें स्वारी खडी आहे. तिचे आटोक्यांत या, कीं स्वर्गद्वाराचीच भेट ! बरें देहांत वळवळ तरी किती ! वानरापेक्षां वृक्षारोहणांत तलख, माशापेक्षां जलतरणांत सराईत, रोहींपेक्षां टिपण टाकण्यांत तरबेज, जेठींपेक्षां पिळदार आणि वाघोबालाही पाणी पाजण्याला समर्थ ! असलें हें प्रकरण आहे ! अशाला माझा दुरून नमस्कार असो !

महादेव हरि मोडक.

---

## ७. संसारसागरावरील भयंकर वादळ.

एकाएकीं तुकारामबोवांच्या संसारसमुद्रामध्यें भयंकर वादळ उत्पन्न झालें व या वादळांत ऐहिक सुखें, विषयोपभोग, धनधान्य-संपत्ति इत्यादिकांसह त्यांच्या प्रपंचनौकेस जलसमाधि मिळाली ! या वादळास तुकारामबोवांच्या वडिलांच्या मृत्यूपासून आरंभ झाला. तुकारामबोवांचे वडील एकाएकीं वारले व संसारांत पुढारीपण पत्करलेल्या तुकारामबोवांवर हा एक मोठाच कठीण प्रसंग कोसळला. बोल्होबा जिवंत होते, तोंपर्यंत संसाराचें धोरण त्यांच्या अनुभविक सल्ल्यानें चालत असे. केव्हां कसाही प्रसंग आला तरीं बोल्होबांचा आपल्याला पूर्ण आधार आहे असें मनांत आलें, म्हणजे तुकारामबोवांना संसारकृत्यें करण्यांत उल्हास वाटत असे

व फार धीर येत असे. उत्तम थाटलेला संसार आपल्या हातीं दिला व पुढें वेळोवेळीं अडीअडचणीला हितावह उपदेश करून योग्य मार्ग दाखविला, म्हणून आपल्या वडिलांविषयीं तुकारामबोवांच्या हृदयांत अत्यंत कृतज्ञता वसत असे:--

अभंग.

बाप करी जोडी लेंकराचे ओढीं, आपली करवंडी वाळवून १
एकाएकीं केला मिरासीचा धनी, कडिये वागवूनी भार खांदीं २
लेववुनी पाहे डोळां अलंकार, ठेवा दावी थोर करूनीयां ३
तुका म्हणे नेदी गांजूं आणिकांसी, उदार जीवासी आपुलिया ४

असे उद्गार ज्या जनकाविषयीं तुकारामबोवांच्या तोंडून निघाले आहेत, त्याचा आकस्मिक अंत झाला असतां, बोवांना किती उदास व निराश्रित वाटलें असेल, याची कल्पना वाचकांनींच आपल्या मनाशीं करावी. वडील वारले, ज्येष्ठ बंधु संसाराविषयीं उदासीन, आई म्हातारी, एक बायको सदा दुखणेकरी, दुसरी तापट व फटकळ, धाकटा भाऊ अगदींच पोरवयाचा, अशी परिस्थिति असतांना, तुकारामबोवांचा धीर सुटून त्यांचें अंतःकरण दडपून गेलें असलें, तर त्यांत फारसें नवल नाहीं. तरी पण, संसार पूर्वीप्रमाणेंच हांकण्याचें त्यांनीं आपलें व्रत ढळूं दिलें नाहीं व कुटुंबांतील माणसांस उणेपणा भासूं दिला नाहीं. पण हें फार दिवस टिकलें नाहीं. तुकारामबोवांवर एकावर एक दुर्दैवाचे आघात झाले व चार पांच वर्षांतच त्यांच्या संसाराची धूळधाण झाली. बापाच्या मागून लवकरच आईचाही काळ झाला. पुढें व्यापाराला बराचसा धक्का

बसून आंतसवाई होऊं लागली. लोकांकडे येणें बरेंच थकलें; बाकी फेडण्याबद्दल तगादा लावणें किंवा दिवाणदरबार करणें हें तुकाराम-बोवांच्या भाविक व दयाळू बुद्धीस पटेना, म्हणून वसूल मंदावून गेला; आणि सावकारांच्या देण्याची धोंड उरावर येऊन पडली. इतक्यांत देशांत भयंकर दुष्काळ पडला. त्यामध्यें तुकारामबोवांच्या घराण्याची अशी कांहीं विलक्षण दैना उडाली, कीं पुसूंच नये. बोवांचें दिवाळें वाजलें. मध्याह्नाचीही भ्रांत पडूं लागली. घरांत धान्याचा कण नाहीं व पदरीं विष खायालाही दमडी नाहीं. आपण उजेडामधून एकदम काळोखांत आलों, म्हणजे तो काळोख जसा विशेषच दाट भासतो, त्याप्रमाणें भरभराटीचा उपभोग घेऊन दारिद्र्याच्या अंधकूपांत पडलेल्या तुकारामबोवांच्या दुःखाला व लाजेला पारच नाहीं असें झालें. इतक्यांत त्यांची पहिली बायको रखमाबाई दुष्काळांत ‘ अन्न अन्न ’ करून मेली. त्यांचा मोठा मुलगा शिवाजी हाही गुदरला. ज्येष्ठ बंधु सावजी याचीही बायको वारली व तो स्वतः संसारावर तुळशी-पत्र ठेवून जो कोठें परागंदा झाला तो कांहीं फिरून आला नाहीं. असा संकटांचा पाऊस कोसळल्यावर तुकारामबोवांच्या मनानें संसाराविषयीं पूर्ण उलट खाल्ली. आपण आजपर्यंत ज्यांत सुख मानून गुंतलों होतों, तो केवळ सुखाभास होता; खरें सुख नव्हतें, अशी त्यांची खात्री पटली. त्यांचें मन आतां खऱ्या सुखाचा ठाव पाह-ण्यासाठीं तळमळूं लागलें. संसारदुःखानें पोळून ते मुमुक्षूच्या पद-वीस पोहोंचले व त्यांच्या आयुष्याच्या दुसऱ्या आणि अत्यंत मह-

त्याच्या अर्थास सुरवात झाली. या वेळेस त्यांचें वय एकवीस वर्षांचें होतें.

तुकारामबोवांसारख्या संतजनांच्या चरित्राचें विवरण करतांना त्यांना काय सुख लाभलें, त्यांना आनंदाचा वांटा किती मिळाला, त्यांचा संसारांत भाग्योदय कसा झाला, त्यांनीं किती संपत्ति सांठविली, इत्यादि गोष्टींचा विचार करून बरोबर—किंबहुना मुळींच—भागणार नाहीं; तर, त्यांनीं काय संकटें भोगलीं, त्यांच्यावर कोणकोणते प्रसंग कोसळले, दुःखाच्या भट्टींत हीणकस खाक होऊन सुवर्णधातूचें उजळ स्वरूप कसकसें ठळक होत गेलें, दुर्दैवाच्या घनप्रहारांनीं त्यांची मनोरचना कसकशी बनत गेली, या गोष्टींचा आढावा काढणें ही महत्त्वाची बाब आहे. दुष्ट व पापी प्रकृतींना ताळयावर आणण्यासाठींच संकटांची आवश्यकता असते असें नाहीं. दुराग्रही, अहंमन्य व गर्वाढ्य प्रकृतीच्या ठिकाणीं सरलता, लीनता, सौम्यपणा व सदयता, यांचा ठसा उमटविण्यासाठीं दुर्दैवाचे निर्घृण निर्घात अवश्य आहेत, हें तत्त्व आम्हांला कबूल आहे. परंतु ज्या सुशील सज्जनांना वांकडा शब्द लावण्यास किंवा यत्किंचित्ही अपाय करण्यास आपलें मन धजणार नाहीं, त्यांचेंही सत्त्व व तेज हीं पारखण्यास व उजळ करण्यास ईश्वरीसत्ता, संकट, दुःख, इत्यादि परंपरांचीच योजना करते. अगदीं निर्दोष, निःस्वार्थ व नवजात बालकाप्रमाणें शुद्ध अशा सदाचारी व्यक्तीचें खरें तेज, गुण, प्रभाव व पवित्रता हीं व्यक्त करून त्यांना परमावधीला नेण्याला—त्यांची पराकाष्ठा करण्याला—क्लेश व अनर्थपात यांचा बिनमोल उपयोग झालेला आहे.

या व्यक्तींचें वास्तविक स्वरूप प्रगट होऊन त्यांच्या उदाहरणीय चारित्र्याचें योग्य महत्त्व जगाच्या डोळ्यांत भरण्याला क्लेश व दुःख हेच राजमार्ग होत, असें म्हटलें असतांही साजण्यासारखें आहे. जर मानवी आत्म्याच्या उन्नतीला दृश्य मर्यादाच बांधतां येत नाहीं, तर मग ती उन्नति अमुक एक मार्गानेंच झाली पाहिजे, ती सुखोपभोगापासूनच व्हावी, दुःखक्लेशांपासून होऊं नये, अशा तऱ्हेचा सिद्धांत तरी आपल्याला कसा घालतां येईल ? तुकारामबोवासारख्या लोकोत्तर महात्म्यांची प्रकृतिच अशी कांहीं विलक्षण असते कीं, तिला जितकी आंच पोहोंचेल, जितकें घर्षण, उच्छेदन, व ताडन होईल, तितकी तिची तेजस्विता अधिक चकाकूं लागेल. टांकीचे घाव सोसल्यावांचून जशी देवकळा येत नाहीं, गारेवर लोखंडाचा कठोर आघात झाल्यावांचून जशी ठिणगी चमकत नाहीं, किंवा पक्कें दधिमंथन झाल्यावांचून जशी सत्त्वनिष्पत्ति होत नाहीं, त्याप्रमाणेंच लोकोत्तर विभूतींचें तेज व सत्त्व हीं क्लेशदुःखांच्या झटक्यांवांचून यथार्थरूपानें व्यक्त होत नाहींत. कित्येक वेळां मनुष्याच्या आयुष्यांतील प्रत्येक क्षणास युगाचें मोल येतें. तुकारामबोवांचें एकविसावें वर्ष याच मासल्याचें होतें. वैशाख-ज्येष्ठांतील अतिशय कडक तापानें तापलेली जमीनच जशी बीज धारण करून आषाढश्रावणांतील पावसाच्या सरींनीं भावी पीक देण्यास लायक होते, त्याप्रमाणेंच संसारतापानें होरपळलेली तुकारामबोवांची मनोभूमि, वैराग्याचें उत्तम बीज धारण करून, ईशभक्तीच्या अमृतानें लोकोपकाराचें भावी पीक पिकविण्यास तयार झाली.

बाळकृष्ण अनंत भिडे.

———

## ८. सैतानाचा हांडा !

मीं माझ्या कन्येसह इ० स० १८८६ सालांतील फेब्रुवारी महिन्याच्या सतराव्या तारखेस " ब्रिटिश प्रिन्सेस " नांवाच्या तारवांत बसून, इंग्लंडांतील लिव्हरपूलचे बंदराहून अमेरिकेकडे प्रयाण केलें. माझ्या इंग्रजी मित्रमंडळीच्या मनांतून मीं ह्या देशीं जावें असें मुळींच नव्हतें; तेव्हां माझें इकडे येणें त्यांस पसंत पडलें नाहीं, हें सांगायला नको ! त्यांपैकीं कित्येक मैत्रिणींनीं तर, आम्ही तारूं फुटून समुद्रांत बुडून मरून जाऊं, असें भाकीत करून ठेविलें होतें ! कारण फेब्रुवारी महिना समुद्रयानास फारसा अनुकूल नसतो. तशांत ह्या वर्षीं ह्या महिन्यांत फारच तुफानें झालीं, आणि अमेरिकेच्या किनाऱ्यानजीक पुष्कळ तारवें फुटलीं. न्यूयार्क शहरानजीक आणि आसपास पंचवीस तीस मैल समुद्रांत कडक थंडीमुळें पाणी थिजून अमेरिका खंडाला बर्फाचें वेष्टन पडलें होतें ! असो, आमचें तारूं लिवरपूल बंदरांतून निघाल्यावर तीन दिवस तुफानाचें कांहीं चिन्ह दिसलें नाहीं; परंतु चवथ्या दिवशीं इंग्लंड आणि अमेरिका ह्या दोन देशांच्या मध्यें अटलांटिक समुद्रांत एक " सैतानाचा किंवा भुताचा हांडा " (Devil's Pot) नांवाचा भाग आहे, त्याच्या नजीक आमचें तारूं आलें. तेव्हां भयंकर तुफानास आरंभ झाला आणि समुद्राचें भयाण स्वरूप आमच्या दृष्टीस पडूं लागलें ! ही वेळ समुद्रप्रवासाला अनुकूल नव्हती, म्हणून आमच्या नावेवर फारसे उतारू नव्हते. पहिल्या वर्गांत चार पुरुष आणि तीन बायका, आणि तिसऱ्या वर्गांत बायका, पुरुष, मुलेंबाळें, मिळून

१९० माणसें होतीं. हीं एकशें नव्वद माणसें युरोपांतील निर-निराळ्या प्रदेशांतून अमेरिकेंत वसाहत करण्याला आलेलीं होतीं.

ह्या एकशें नव्वद उतारू लोकांपैकीं कांहीं धार्मिक लोकांनीं आदित्यवारीं नावेच्या मधल्या मजल्यावर उघड्या भागांत जमून संगीतें गाऊन ईश्वरोपासना केली. त्या रात्रीं फारच कडाक्याचें तुफान झालें. ह्या प्रसंगीं मीं एका बाईच्या तोंडून एक चमत्कारिक गोष्ट ऐकिली. ती एथें लिहिल्या-वांचून राहवत नाहीं. सदरील बाई आमच्या शेजारीं पहिल्या वर्गांतील एका खोलींत रहात असे, तेव्हां जलप्रवासांत तिच्याशीं माझें विशेष संघट्टण होतें. ही बाई रोमनक्याथोलिक मताची होती. तिनें मला सांगितलें कीं, सदरीं सांगितलेले उतारू संगीतें गात होते. तेव्हां नावेंतील एका मनुष्याला तें सहन न होऊन त्यानें, " आज रात्रीं खचीत तुफान होईल." असें भाकीत करून उतारू लोकांच्या वर्तनाविषयीं कुरकुर केली. तो म्हणाला कीं, " हे लोक ईश्वराची उपासना करून सैतानाला कोपवीत आहेत. तो आज तुफान आणून आमच्याशीं युद्ध केल्यावांचून राहणार नाहीं. " कर्मधर्मसंयोगानें त्या रात्रीं तुफान होऊन त्याचें भाकीत खरें झालें ! पुढें आणखी एके दिवशीं रात्रीं ते लोक कांहीं पदें गाऊं लागले. तेव्हां तर त्या मनुष्याला फारच राग आला. त्यानें पूर्वींप्रमाणेंच तुफान होईल असें भाकीत केलें आणि तें खरेंही झालें. पुढें दुसऱ्या रविवारीं कांहीं मुलें तो दिवस प्रसन्न असून फारसें तुफान नव्हतें म्हणून नावेच्या वरच्या बाजूस येऊन

" हालेलुया, हालेलुया "—( ह्या हिब्रू शब्दाचा अर्थ ' ईश्वराची स्तुति करा ' असा आहे. ) असें गाऊं लागलीं, तेव्हां आमच्या कर्णधाराचा राग त्याच्या पोटांत मावेना. त्यानें लागलीच बाहेर जाऊन त्या अविचारी मुलांचीं तोंडें बंद केलीं. परंतु त्या दिवशीं खरोखरच सैतानानें ह्या कर्णधाराची पाठ पुरवली म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. त्या दिवशीं आमची नाव समुद्रास्तृप्यंतु होण्याच्या बेतांत होती ! ही ह्या कर्णधाराची गोष्ट खरी असल्यास इंग्लंडांतीलु सुशिक्षित आणि सुधारलेल्या लोकांपैकीं कित्येक अद्यापि भूतप्रेतपिशाचबाधेविषयीं दृढ विश्वास बाळगतात असें म्हटलें पाहिजे. असो.

ह्या तुफानामुळें आम्हांला फारच त्रास झाला. क्षणोक्षणीं समुद्राच्या मोठाल्या लाटा आमच्या खोल्यांच्या खिडक्यांवर येऊन आदळत असत. तेव्हां ही नाव आतां बुडते कीं घटकेनें बुडते, असा संशय येई. तीन चार दिवसांत आमच्याच्यानें नुसतें डोकें सुद्धां वर करवेना; मग उठून चालण्याफिरण्याची गोष्ट तर लांबच राहिली. शेवटीं आमच्या खोलींतील वारा इतका अशुद्ध झाला कीं, तेथें राहून श्वासोच्छ्वास करणें फारच अवघड वाटूं लागलें. तेव्हां आतां काय पाहिजे तें होवो, पण एकदां नावेच्या वरच्या मजल्यावर जायचेंच असा निश्चय करून आमची स्वारी जणूं काय जीव मुठींत धरून खोलीच्या बाहेर पडली ! पण पुढें चालून वरती जावें कसें ? नावेच्या हालण्यामुळें नावेच्या तळावर माझा पाय ठरेना. शेवटीं कसें तरी करून एकदाची वर जाऊन एका खुर्चीवर

बसलें. तेथें गेल्यावर सुमारें पाव तासाचे आंत समुद्राची स्वच्छ हवा लागून माझ्या शरीरांत जणूं काय नवीन जीवनशक्तीचा प्रवेश झाला. एका घटकेच्यापूर्वी समुद्राची लाट खिडकीवर आद-ळत असतां कांहीं चमत्कारिक भीतीमुळें माझ्यानें तिकडे पाहवत सुद्धां नसून पोटांत धस्स होत असे. पण घटकेंत काय अद्भुत चमत्कार झाला तो पहा ! आतां वरच्या मजल्यावर उभी राहून, नाव बुडूं बुडूं होत असतां तें समुद्राचें अफाट आणि भयंकर स्वरूप पाहूनही मला काडीइतकें देखील भय वाटलें नाहीं ! उलट उत्साह, आनंद आणि शांति माझ्या हृदयांत उदित होऊं लागलीं. ह्या वेळीं ह्या स्वाभाविक घटनेपासून मी जो धडा शिकलें तो कधीं विसरणार नाहीं. मनुष्य जोंपर्यंत धैर्यानें विपत्ति आणि शत्रु यांचा सन्मान करीत नाहीं तोंपर्यंत त्याला त्यांचा मोठा बाऊ वाटतो. पण गड्या, एकदां ‘ कार्यं वा साधयेयं देहं वा पातये-यम् ’ ( एक तर कार्य साधीन, नाहीं तर शरीर टाकीन ) असा निश्चय करून तुझ्या शत्रूंचा आणि निराशादि विपत्तींचा सामना कर, म्हणजे भय हा शब्द तुझ्या स्मरणांतून नाहींसा होईल, आणि तूं जीवन्मुक्ताप्रमाणें निर्भय होऊन सारें जग तुझ्या विरुद्ध असलें तरी सत्यावर आणि सत्साहसावर अवलंबून आपलीं कार्यें साधशील. ह्या अगाध संसारसमुद्रांत आमच्या वाताहत नावांना किती तुफा-नांचा सामना करावा लागत नाहीं ? त्या वेळीं धैर्य धरून भयंकर समुद्रकल्लोळांशीं झुंजलों तर खचीतच आम्हांला जयश्री मिळेल आणि मनाला शांतिही प्राप्त होईल. परंतु पाल पसरण्याच्या किंवा गुंडाळण्याच्या उद्देशानें डोलकाठीवर चढत किंवा उतरत असतांना

जर करतां मिथ्याभयरूपी भुतानें आमच्या हृदयांत संचार केला आणि आमचे हातपाय थरथरां कांपूं लागले तर मात्र आमची दशा कुत्र्यालाही नकोशी होईल !

आमची नाव पांच सहा दिवस " भुतांच्या हांड्यां"त पिंगा घालीत होती ! ह्या हांड्यामध्यें आल्यावर तिच्यांतील वाफेचें यंत्र कांहींसें बिघडलें. तें दुरुस्त केल्यावांचून नाव वेगानें चालविली असती तर ती समुद्रापण होण्याला कांहीं उशीर लागला नसता; आणि यंत्र दुरुस्त करावें म्हटलें तर समुद्रकल्लोलांपुढें नाव एके ठिकाणीं उभी करतां येईना. बिचाऱ्या नावाध्यक्षाला ह्या वेळीं मोठें संकट पडलें; परंतु शेवटीं हळूहळू यंत्र दुरुस्त करून पुनः पाहिल्या-प्रमाणें नाव चालूं लागली. " भुताच्या हांड्यां"तून निघाल्यावरही समुद्राच्या पर्वतप्राय लाटांच्या जोरानें आमची नाव एकदां आकाशांत आणि एकदां पाताळांत जाई ! तेव्हां ती आतां बुडते कीं क्षणांत बुडते असा संशय सहज मनांत येई. त्या अफाट पारा-वारशून्य समुद्रांत वरच्या बाजूस कधीं स्वच्छ, कधीं अभ्राच्छादित अशा आकाशाचा गोल चांदवा, खालीं हिमालयाच्या लहान लहान टेंकड्या-एवढाले कल्लोळ आणि त्यांवर आपटत असलेली आमची नाव ! भोंवतालच्या देखाव्याशीं तुलना करून पाहिल्यास आमची नाव पाण्यावर तरंगत असलेल्या लहानशा उडत्या माशा-सारखी दिसत होती म्हटल्यास चिंता नाहीं ! तुफानाच्या वेळेस ‘ गल ’ नांवाचे समुद्रपक्षी चोहोंकडे समुद्रांत तरंगत असलेले दिसतात. हे पक्षी खरोखरच तुफानाचे अग्रदूत आहेत. तुफान

व्हावयाचें असलें म्हणजे ते मोठ्या वेगानें समुद्रावर उडत फिरूं लागतात; आणि तुफानाच्या वेळेस समुद्रकल्लोलांवर बसून मोठ्या हर्षानें जलक्रीडा करूं लागतात! चोहोंकडून मोठमोठाल्या लाटा उसळून येऊन एकमेकांवर आपटत आहेत, वारा मोठ्या सोसा-ट्याचा वाहात आहे, समुद्राच्या वरल्या भागावर पराकाष्ठेचें धुकें पडलें आहे आणि समुद्राच्या व मेघांच्या गर्जनेनें लोकांच्या कान-ठळ्या बसत चालल्या आहेत, तरी ह्या आनंदी पक्ष्यांना त्याचें कांहीं वाटत नाहीं! ते खुशाल मजा करीत असतात! एकादा अरब जसा आपल्या तरुण तेजस्वी घोडयाला वायुवेगानें दामटीत जातो, त्याप्रमाणें ते मोठमोठाल्या कल्लोलांच्या पाठीवर बसून जसे काय शर्यत खेळत असतात! केव्हां केव्हां मेघांचीं पटलें फोडून सूर्यनारायण विजयी वीराप्रमाणें आकाशांत प्रकाशमान होई, तेव्हां गगनमंडलांत सबंध इंद्रधनुष्याचा देखावा वर्णनीय व आनंदकारक असा होत असे! कधीं कधीं दीड किंवा दोन इंद्रधनुष्यें पाहण्यांत येत! केव्हां केव्हां समुद्रकल्लोल नावेवर किंवा एकमेकांवर आद-ळल्यानंतर वाऱ्याचे जोरानें कांहीं दूरपर्यंत तुषार उडत जाई, तेव्हां त्यावर सूर्यप्रकाश पडून इंद्रधनुष्य उत्पन्न होत असे! अहाहा! त्या वेळची समुद्राची व आकाशाची शोभा किती तरी वर्णावी! ती शोभा पहात असतां डोळ्यांच्या पापण्या मिटणेंही बरें वाटत नसे, इतकी ती चित्तवेधक आणि दृष्टिरंजक होती? तुफानाचा कांहींसा उपशम झाल्यावर आमची नाव अमेरिका खंडापासून तीन दिवसांच्या रस्त्यावर येऊन पोहोंचली, तेव्हां कित्येक उडते मासे समुद्रावर उडत असतां आमच्या दृष्टीस पडले.

मार्च महिन्याच्या तिसऱ्या तारखेस संध्याकाळचे सुमारें साडे-चार वाजतांना, इ० स० १४९२ त ज्या भूखंडाला पाहून क्रिस्टोफर कोलंबसानें आपण भूगोलाभोंवतालून जलयात्रा करून हिंदुस्तानास येऊन पोहोंचलों असा सिद्धांत केला, त्या पश्चिम गोलार्धांतील अमेरिका खंडाचा किनारा आमच्या दृष्टीस पडला. ह्यावेळीं मला जो काय आनंद झाला तो वर्णितां येत नाहीं. मीं मनांत म्हटलें, ‘ आमच्या हिंदुस्तानी मित्रांनो, आतां आमच्या पायांचे तळवे तुमच्या तळपायांकडे वळलेले आहेत ! एथें ढवळा दिवस असून तुमच्याकडील भागावर रात्रीचें पांघरूण पडलें आहे. आतां आम्ही येथें नावेवर शतपावल्या करीत गोष्टी सांगत आहों आणि तुम्ही तिकडे अंथरुणावर घोरत पडलां आहां ! हा पहा काय चमत्कार आहे तो ! ’

पंडिता रमाबाई.



## ९. वचनासक्ति.

सत्यप्रीतीशीं ज्या गुणाचा संबंध आहे, असा गुण वचनासक्ति हा होय. दोन्ही गुणांचें बरेंच तादात्म्य आहे. सत्यप्रीति नाहीं, तर वचनासक्ति असावयाची नाहीं. सूक्ष्म रीतीनें विचार करितां दोन्ही गोष्टी एकच आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. तेव्हां सत्याची जी मातब्बरी तीच वचनाची मातब्बरी आहे. रामायण-भारतांत वचन पाळल्याविषयींच्या अनेक कथा आहेत. आपली

बायको कैकेयी हिला जें वचन दिलें तें पूर्ण करण्याकरितां दशरथ-राजानें आपला प्रिय पुत्र राम ह्यास वनवासास पाठविलें व तो पुत्र-शोकानें मरणही पावला. बापानें जें वचन दिलें तें आपणच दिलें, असें समजून रामानें चवदा वर्षें वनवास भोगिला. हरिश्चंद्र-राजानें आपली प्रिय पत्नी तारामती व पुत्र रोहिदास ह्यांसह अनेक विपत्ति भोगिल्या; परंतु वचनभंग होऊं दिला नाहीं. पुण्यश्लोक नलराजानें आपली पत्नी दमयंती हिजसह हालअपेष्टा भोगिली, परंतु जो करार केला तो मोडला नाहीं. स्त्रियांवर शस्त्र उचलावयाचें नाहीं, हें व्रत पाळण्यासाठीं भीष्मांनीं आपला नाश होऊं दिला. धर्मराजानें आपलें वचन पाळण्यासाठीं आपल्या बंधूंसह बारा वर्षें वनवास भोगिला. वचनभंग होऊं नये, ह्या हेतूनें शिबिराजानें आपलें मांस अर्पण केलें. श्रियाळ राजानें वचन राखण्यासाठीं आपला पुत्र सुद्धां बळी दिला; परंतु वचनभंग होऊं दिला नाहीं. अशा प्रकारें रामायण-भारतादि ग्रंथांत अनेक कथा आहेत. ह्या सर्व कथांचें सार पाहूं गेलें असतां हें आहे कीं, आपणावर कसलाही प्रसंग आला असतां थोर पुरुष वचनभंग होऊं देत नाहींत. जें वचन आपण दिलें तें पाळण्यासाठीं आपणास दारा, पुत्र व बंधु यांचा वियोग होत असला तरी होऊं देतात, आपले हाल झाले तरी होऊं देतात, दुःख भोगावें लागलें तरी ते भोगतात, परंतु दिलेलें वचन परत घेत नाहींत. धमकीमुळें, भयामुळें, गैरसमजामुळें, असावधपणा-मुळें, अज्ञानामुळें किंवा नाइलाजामुळें मला वचन देणें भाग पडलें, तेव्हां अशा स्थितींत दिलेलें वचन मी कसें पाळूं, असें रडगाणें गाऊन आपली दुर्बलता जगास व्यक्त करीत नाहींत. ते सुखावर

पाणी सोडतात, प्रसंग पडल्यास देहावरही पाणी सोडतात, परंतु वच-नावर पाणी सोडीत नाहींत. थोर पुरुष वचनाची जितकी मातब्बरी मानतात तितकी सुखाची मानीत नाहींत. ' न च प्रसादः पुरुषेषु मोघः ' म्हणजे थोर पुरुषांचा प्रसाद् कधींही वायफळ जावयाचा नाहीं. त्यांचें वचन नेहमीं अमोघ असावयाचें. तोंडांतून एकदां शब्द गेला कीं गेला, त्याप्रमाणें चालावयाचेंच. अशा प्रकारें ते करारी पुरुष वागतात.

सत्य भाषण करावें, असें म्हणणारे ज्याप्रमाणें पुष्कळ आहेत, त्याप्रमाणें वचन पाळावें, असेंही म्हणणारे पुष्कळ आहेत. ' वचने किं दरिद्रता ' ह्या न्यायानें वचनें देण्यांत रेलचेलपणा फार असतो, परंतु वचनाप्रमाणें म्हणजे बोलल्याप्रमाणें चालणारे थोडे असतात. वस्तुस्थिति पहातां रावापासून रंकापर्यंत सर्वांची स्थिति प्रायः सारखी आहे. वचन पाळणारे थोडे, थापा मारणारे पुष्कळ. थोडक्या लाभासाठीं अगर सुखासाठीं किंवा थोडा त्रास अथवा नुकसान होऊं नये म्हणून लाख रुपये किमतीच्या वचनावर पाणी सोडणारे जर कांहीं लोक दृष्टीस पडतात, तर मोठ्या लाभासाठीं अथवा सुखासाठीं वचनभंग करणारे पुष्कळ आढळावे, यांत नवल नाहीं. ही जी स्थिति दृष्टीस पडते तीस अशिक्षित कारण असून सुशिक्षित कारण नाहींत, किंवा गरीब कारण असून श्रीमंत कारण नाहींत, किंवा जुन्या समजुतीचे लोक कारण असून नव्या सम-जुतीचे लोक कारण नाहींत,—तात्पर्य, अमुक एक प्रकारचे लोक या स्थितीस कारण आहेत व अमुक लोक कारण नाहींत, असें नाहीं.

वर ज्या प्रकारचे लोक निर्दिष्ट केले त्यांपैकीं, बहुतेक कमजास्त दोषी आहेत, असें म्हणणें भाग पडतें.

वरील स्थितीचें कारण पाहूं गेलें असतां, वचनाची मातब्बरी जितकी मानावी तितकी आम्ही मानीत नाहीं हेंच होय. नुकसानीची किंवा त्रासाची, अथवा लाभाची किंवा सुखाची बाब येऊन ठेपली, म्हणजे आम्ही सदसद्विचारशक्तीची व तिजबरोबर सर्व उत्तम गुणांची रजा घेऊन वचनावर पाणी सोडतों. "समजूत करण्यासाठीं किंवा थट्टेंत जी गोष्ट करण्याचें कबूल केलें, ती केली नाहीं म्हणून काय झालें? ज्यापासून नफानुकसान नाहीं, ती गोष्ट केली काय किंवा न केली काय, त्याची मातब्बरी सारखीच. जर आम्ही कोणाचें नुकसान करीत नाहीं, तर थाप मारली म्हणून काय झालें? दुसरे जर वचन मोडतात, तर आम्हींच तें कां पाळावें?" हे व अशाचसारखे दुसरे विचार पोरकट आहेत. वचनाच्या संबंधानें नफानुकसानीचा प्रश्न किंवा थट्टेची अथवा विनोदाची बाब किंवा पोकळ सबबीची गोष्ट पुढें आणणें मूर्खपणा आहे. वचनाच्या बाबतींत थाप नको किंवा लपंडाव नको. ज्यांस वचन पाळावयाचें नाहीं त्यांसाठीं, किंवा ज्यांनीं आपल्या आयुष्याची थट्टा मांडिली आहे त्यांसाठीं, वरील प्रकार आहेत; त्यांस वरील म्हणणें शोभतें. वरील गोष्टी दिसण्याला क्षुल्लक दिसतात, परंतु हळूहळू त्यांनीं मन घट्ट होत जातें. तोंडांतून जो जाब गेला तेंच वचन. वचन, वचन म्हणजे कांहीं निराळी चीज नाहीं. त्यासाठीं विधि नको, संस्कार नको किंवा समारंभ नको. चारचौघांच्या देखत जें वचन

देण्यांत येतें तेवढेंच वचन, व एकांतीं बोललें तें वचन नाहीं, असें नाहीं. ज्याप्रमाणें सत्याच्या संबंधानें तडजोड नाहीं, त्याप्रमाणें वचनाच्या संबंधानें तडजोड नाहीं. करार करणें, कबूल करणें, विश्वास दाखविणें, आश्वासन देणें व सही करणें हे निराळे शब्द आहेत, परंतु खरोखर पाहतां हे वचनाचेच प्रकार होत. हीं सर्व वचनेंच होत. हीं वचनें विधिपूर्वक दिलेलीं असोत, किंवा तशींच दिलेलीं असोत; एकांतीं दिलेलीं असोत, किंवा चारचौघांत दिलेलीं असोत; डोळे मिटून दिलेलीं असोत, किंवा डोळे उघडून दिलेलीं असोत; तोंडीं असोत किंवा लेखी असोत; नोंदलेलीं असोत किंवा नोंदलेलीं नसोत; सदाचारसंपन्न पुरुषांच्या दृष्टीनें त्यांची योग्यता सारखीच आहे. कोणत्या स्थितींत अथवा कशा प्रकारें वचन देण्यांत आलें, ही महत्त्वाची गोष्ट नाहीं. तोंडांतून जाब गेला किंवा नाहीं, हातानें लेख लिहून दिला किंवा नाहीं, किंवा स्वतःच्या कृतीनें विश्वास उत्पन्न केला किंवा नाहीं, ही गोष्ट महत्त्वाची आहे. जर जाब गेला असेल, किंवा लेख गुंतला असेल, किंवा विश्वास उत्पन्न केला असेल, तर त्याबद्दलची जबाबदारी आपणांवर आहे. अशा प्रकारें वचन देण्यापूर्वीं एक वेळ सोडून शंभर वेळां विचार करणें योग्य. वचनाप्रमाणें चालतां येईल किंवा नाहीं, ह्याविषयीं संशय वाटल्यास तें न देणें योग्य; परंतु तें एकदां दिलें, म्हणजे त्याप्रमाणें वागणें उत्तम आहे, इतकेंच नाहीं, तर अवश्य आहे. त्याप्रमाणें न चालणें गर्हणीय आहे.

शंकर रामचंद्र हातवळणे.

---

## १०. उत्तररामचरित्राचें संविधानक.

राम राज्यावर बसून कांहीं काळ लोटल्यावर ऋष्यशृंगानें द्वादशवार्षिक सत्र आरंभिलें. ऋष्यशृंग हा रामाची बहीण शांता हिचा नवरा. यानें बोलावल्यावरून रामाच्या तिधी आया, वसिष्ठ व अरुंधती अशीं राजकुलांतील वडील माणसें तिकडे गेलीं. जनक राजा राम, लक्ष्मण व सीता यांस भेटण्याकरितां अयोध्येस येऊन कित्येक दिवस राहिला होता, तोही नुकताच मिथिलेस परत गेला. त्यामुळें जानकीस खेद झालेला पाहून तिच्या करमणुकीस्तव रामानें आपल्या सर्व वृत्तांताचा चित्रपट तयार करविण्यास लक्ष्मणास सांगितलें होतें. तो घेऊन लक्ष्मण आला, व तीं चित्रें अनुक्रमेंकरून तो दाखवीत असतां रामास त्या त्या वृत्तांताचे स्मरणानें पूर्वानुभूत, हर्ष, विरह, शोक इत्यादि मनोवृत्तींचा पुन्हां एकवार पहिल्याप्रमाणें अनुभव घडला. याप्रमाणें पाहतां पाहतां दंडकारण्यांतील गोष्टीपर्यंत जेव्हां आलें, तेव्हां रामास जानकीवियोगाचें दुःख असह्य होऊन त्यानें लक्ष्मणास 'थांब' म्हणून सांगितलें. सीतेस ती विचित्र वनशोभा पाहून गर्भारपणामुळें असा डोहळा झाला कीं, भागीरथीच्या पवित्र तीरीं जाऊन तेथील वनांत रहावें. मग तिची ती इच्छा पूर्ण करण्यास रामानें लक्ष्मणास रथ तयार करण्यास सांगितलें. लक्ष्मण तिकडे गेल्यावर सीता चित्रदर्शनानें परिश्रांत होऊन रामाचा हात उशाशीं घेऊन निजली. इतक्यांत दुर्मुख नांवाचा रामाचा चोरबातमीदार आला. त्यास रामानें आपणाविषयीं लोक काय बोलतात असें विचारल्यावरून सीतेविषयीं भयंकर लोकापवाद त्यानें त्याच्या कानांत सांगितला. तो ऐकतांच राम मूर्च्छित झाला, पण पुन्हां सावध

होऊन निरुपायास्तव त्यानें सीतेस अरण्यांत सोडण्याविषयीं निश्चय केला. मग त्या क्रूर संकल्पाप्रमाणें करण्यास त्यानें दुर्मुखाकडून लक्ष्मणास सांगविलें. यानंतर पुढील पुष्कळ वृत्तांत,—म्हणजे कुश व लव हे जुळे मुलगे गंगेनें स्वतः आणून वाल्मीकीच्या स्वाधीन केले; ब्रह्मदेवानें वर दिल्यावरून तो आद्यकवि रामायण रचावयास लागला; वसिष्ठ, अरुंधती व रामाच्या आया इतकींजणें सत्रसमाप्ती-नंतर वाल्मीकीच्या आश्रमांत येऊन राहिलीं; रामानें अश्वमेधास आरंभ करून घोडा सोडला, व त्याबरोबर सेनेसहवर्तमान लक्ष्म-णाचा मुलगा चंद्रकेतु याची योजना केली—हा सर्व वृत्तांत वासंती नांवाची जनस्थानांत[1] राहणारी वनदेवता व वाल्मीकीच्या आश्र-मांत राहणारी तापसी आत्रेयी यांच्या परस्परसंवादांत सुचविला आहे. आत्रेयीनें शेवटीं हेंही सांगितलें आहे कीं, शंबूक नामक शूद्र या पंचवटींत स्वधर्मविरुद्ध तपश्चरण करून लोकांच्या अकाल-मरणादि अनर्थांस कारण होत आहे असें आकाशवाणीनें सांगितल्या-वरून राम त्यास दंड करण्याकरितां लवकरच इकडे येणार आहे. त्याप्रमाणें राम येऊन त्यानें शंबूकाचा वध करितांच तो दिव्य देह धारण करून प्रकट झाला. पुढें शंबूकाच्या भाषणावरून तें दंड-कारण्य होय असें रामास समजून तो पूर्ववृत्तांत आठवून तेथील शोभा पाहूं लागला. नंतर अगस्त्यांच्या अश्रमाकडून बोलावणें आल्यावरून त्यांच्या दर्शनास तिकडे गेला. तिकडून परत अयोध्ये-कडे जातांना रामानें आपलें पुष्पक विमान पुनः त्या दंडकारण्यांत

---

१ सांप्रत ज्यास ‘ नाशिक ’ म्हणतात त्याच्याच भोंवतालच्या प्रदेशास प्राचीनकाळीं ‘ जनस्थान ’ असें म्हणत असत.

थांबविलें, कीं पूर्वींचीं स्थलें पाहून सीताविरहाचें दुःख अंमळ हलकें करावें. परंतु तसें न होतां जनस्थानाच्या दर्शनानें त्याचें वियोग-दुःख अधिक जागृत मात्र होऊन त्यास मूर्च्छा आली. हा होणारा अनर्थ गंगेनें आधींच जाणून त्याच्या निवारणाचा उपायही योजून ठेविला होता. तो हा कीं, आपल्या प्रभावानें सीतेस अदृश्य राहण्याची शक्ति देऊन तमसेस तिजजवळ ठेविली होती. यास्तव राम मूर्च्छित पडतांच सीता अदृश्यरूपानें त्याजवळ गेली, आणि तिच्या हाताचा परिचित स्पर्श होतांच राम सावध झाला, पण डोळे उघडून पाहातो तों जवळ कोणी नाहीं. तेव्हां फार खेद होऊन त्यास वाटलें कीं, सीतेच्या निदिध्यासामुळें मला ही उगीच भ्रांति झाली. इतक्यांत वनदेवता वासंती घाबऱ्या घाबऱ्या रामाकडे आली; आणि सांगूं लागली कीं, सीतेनें ज्यास पूर्वीं आपल्या हातानें वाढविलें त्या तरुण लहान हत्तीवर एक मोठा दुसरा हत्ती घाला घालीत आहे. तेव्हां त्यास सोडविण्याकरितां राम त्वरेनें तिकडे गेला. पण पाहतो तों तोच जय पावून आपल्या स्त्रीसहवर्तमान खुशाल जलविहार करीत आहे. याप्रमाणेंच इतर पशुपक्षीही पूर्वींच्या परिचयाचे त्यानें पाहिले, व वासंतीनें पूर्वींच्या अनेक प्रसंगांचें रामास स्मरण दिल्यामुळें त्या त्या औत्सुक्यादि वृत्ति त्याच्या मनामध्यें उठल्या. बोलतां बोलतां सीतेविषयींही गोष्ट काढून तिचा परित्याग केल्या-बद्दल वासंतीनें केवळ हृदयभेदक अशा शब्दांनीं रामाचा उपालंभ केला. रामासही सीतेचा समागम चिरकाल अंतरल्यावरून व घोर अरण्यांत तिची गति काय झाली ती मुळींच न कळल्यावरून अत्यंत गहिंवर आला; व दुःखावेग सहन न होऊन मूर्च्छाही आली.

तेव्हां पहिल्याप्रमाणें सीतेनें त्याच्या ललाटास आपल्या हातानें स्पर्श करून त्यास सावध केलें. पण त्याच्या किंवा वासंतीच्या ती दृष्टीस पडली नाहीं. शेवटीं अश्वमेधाचा काल अंतरेल यास्तव वासंतीस पुसून राम विमानांत बसून अयोध्येकडे निघाला. यापुढील स्थळ वाल्मीकीचा आश्रम कल्पिला आहे. तेथें वसिष्ठ, अरुंधती, वगैरे मंडळी होतीच; आणि जनकही वाल्मीकीस भेटावयास आला आहे. त्यांचा सीतेच्या भयंकर गतीस्तव शोक चालला असतां आश्रमांतील बटूंपैकीं एक त्यांच्याकडे आला. त्यानें माझें नांव लव व वडील भावाचें नांव कुश असें सांगितलें. आई-बापांचीं नावें विचारितां तीं मला माहीत नाहींत, आम्ही दोघे वाल्मीकिऋषींचे, इतकेंच काय तें आम्हांस ठाऊक आहे, असें तो बोलला. तरी जनकास व कौसल्येस त्या मुलाच्या तोंडवळ्यावरून व चालचलणुकीवरून सीतेच्या व रामाच्या खुणा पटल्या. इतक्यांत त्या मुलाचे खेळगडी धांवत धांवत त्याजकडे आले आणि ' अश्व ' या नांवाचा एक चमत्कारिक पशु आपल्या आश्रमांत आला आहे, तो तुला दाखवतों चल, असें म्हणून ते त्यास घेऊन गेले. पुढें त्यानें तो अश्व धरून ठेवल्यावरून त्याचे रक्षक त्याच्यावर चालून आले. पण रामाचीं दिव्य अस्त्रें त्यांस जन्मतःच प्राप्त झालीं असल्या-मुळें त्यानें एकट्यानें सर्व सैन्याचा पराभव केला. तें वर्तमान ऐकून कुमार चंद्रकेतु त्याशीं भिडावयास आला. नंतर दोघांचीं वीरभाषणें होऊन युद्धप्रसंग झाला. हें सर्व राम शंबूकवध करून दंडकारण्याहून परत येण्याच्या आंत झालें. मग राम येतांच त्यानें दोघांस युद्ध थांबविण्यास आज्ञा देऊन आपणाकडे बोलाविलें. चंद्रकेतूनें लवाची

फार प्रशंसा केली; व रामायण-कथेचा मूळपुरुष हा, असें समजतांच लवानेंही रामास वंदन केलें. पुढें कुशही तेथें येऊन, रामास अनेक कारणांवरून आपल्या दोघां पुत्रांची ओळख पटली. वाल्मीकिऋषींच्या आज्ञेवरून लक्ष्मणानें गंगातीरीं मोठा समाज बसण्यासारखी रंगभूमि तयार केली, व तेथें त्या रचलेल्या लहानशा नाटकाचा अप्सरांनीं प्रयोग केला. हा प्रयोग सर्वांसमक्ष करण्याचा मुनीचा उद्देश हा कीं, सीतेस वनांत सोडल्यावर पुढें काय वृत्तात झाला तो सर्वांस विदित व्हावा. त्याप्रमाणें सीतेनें आपला देह गंगेंत टाकिला, व तीस दोन पुत्र झाल. नंतर गंगेनें व पृथ्वीनें तिचें रक्षण करून दोघां पुत्रांस क्षत्रसंस्कार करण्यास्तव वाल्मीकीच्या स्वाधीन केलें, इत्यादि सर्व वृत्तांत त्या दृश्य काव्यांत लोकांस प्रत्यक्ष झाल्यासारखा झाला. शेवटीं या उपवनांतील सीतेनें पृथ्वीच्या पोटांत ठाव मागितला, व ती आंत गडप झाली. नंतर सर्व पडद्यांत गेल्या, परंतु लागलीच सर्वांसमक्ष खरोखरीची सीता, गंगा व पृथ्वी अशा तिघी गंगेंतून निघाल्या व याप्रमाणें रामांनीं सीतेचा पुनः अंगीकार केला. शेवटीं वाल्मीकिऋषीनें सर्वांस आशीर्वचन केलें आहे.

विष्णुशास्त्री चिपळुणकर.

---

## ११. विजयनगरचा इतिहास.

उत्तरेकडच्या भागांत मुसलमान लोक आपला अंमल वसवीत असतां, दक्षिण द्वीपकल्पांत विजयनगरचें प्रबळ हिंदुराज्य हयात होतें. माधवाचार्य, अप्पया दीक्षित वगैरे मोठमोठे मध्यकालीन

पंडित ह्याच राज्यांत उदयास आले. हिंदूंच्या उत्कर्षास त्या वेळेस अन्यत्र योग्य जागा नव्हती. ह्या राज्याचा विस्तार कन्याकुमारीपासून जवळ जवळ बेळगांवपर्यंत होता. ब्राह्मणीराज्य स्थापन झाल्यापासून ह्या हिंदुराज्याशीं मुसलमानांचीं युद्धें अव्याहत चाललीं होतीं. ह्या राज्याचा समग्र इतिहास उपलब्ध नाहीं; पण शिलालेखांवरून वगैरे थोडीबहुत माहिती मिळते.

विजयनगर हें शहर तुंगभद्रेच्या दक्षिणतीरावर असून उत्तरतीरावर अनागोंदी हें शहर होतें. त्या ठिकाणीं हल्लीं पुरातनकाळचीं अनेक देवळें आहेत. आरंभीं जे युरोपियन तेथें आले, त्यांनीं ह्या राज्यास नरसिंहरायाचें राज्य, व त्या देशास नरसिंहदेश असें नांव दिलें. विजयनगर हें फार दाट वस्तीचें व विस्तीर्ण शहर असून तेथें परदेशच्या सर्व मालाची देवघेव होत असे. ह्या राज्यांत कृष्णा व तुंगभद्रा ह्या दोन नद्यांच्या दक्षिणेकडील सर्व मुलुखाचा व मलबार प्रांताचा समावेश होत होता.

विजयनगरच्या स्थापनेविषयीं निरनिराळ्या दंतकथा आहेत. कल्याणच्या कलभूरी वंशाचा राजा विशाल ह्याचा भाऊ विजय ह्यानें हें शहर स्थापन केलें, अशी एक कथा आहे. दुसरी अशी एक कथा आहे कीं, मुसलमानांनीं वरंगूळचें राज्य सन १३२२ त घेतल्यावर तेथील सरदार बुक्क आणि हरिहर ह्यांनीं मुसलमानांची नौकरी पतकरली. पुढें त्या दोघांस म्हैसूरच्या बल्लाळ राजांवर पाठविण्यांत आलें. तेथें त्यांचा पराभव होऊन ते पळून गेले, व पंडित विद्यारण्याच्या मदतीनें त्यांनीं विद्यानगर अथवा विजयनगर हें शहर स्थापन केलें.

विद्यारण्य किंवा माधवाचार्य ह्यांची संस्कृत विद्येविषयीं मोठी ख्याति आहे. धर्म, नीति, तत्त्वशास्त्र, न्याय, व्याकरण इत्यादि शास्त्रांवर ह्यांनीं केलेले मोठमोठे ग्रन्थ आज सर्वमान्य आहेत. ह्यांचा भाऊ सायनाचार्य ह्यानें वेद व उपनिषद् ह्यांवर प्रचंड भाष्य लिहिलें आहे. ह्या पुरुषांविषयीं असा शिलालेख सांपडतो कीं, हिंदुस्तानच्या दक्षिण भागांत कंप नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याचा पुत्र संगम ह्याचा प्रधान माधवाचार्य होता. संगमाचे पुत्र बुक्क आणि हरिहर ह्यांचाही तो प्रधान होता. चालुक्यांचें व बल्लाळांचें राज्य मोडत चालल्यावर संगमानें किंवा त्याच्या पुत्रांनीं विजयनगरास स्वतंत्र राज्य स्थापिलें असावें, हें जास्त संभवनीय दिसतें. हें १३३६ ह्या वर्षीं स्थापन झालें असें मानण्यास आधार आहे.

फेरिस्त्याच्या इतिहासावरून ब्राह्मणी राजांच्या वर्णनांत विजय-नगरचे राज्याविषयीं जी वेळोवेळीं माहिती आली आहे, ती पूर्वीं देण्यांत आलीच आहे. महंमदशाहानें विजयनगरचा राजा कृष्णराय व त्याचा सेनापति भोजमल्ल यांचा इ० स० १३६६ त पराजय केला. मुजाहिदशाहाच्या कारकीर्दींतही कृष्णरायाबरोबर पुष्कळ दिवस युद्ध होऊन त्याचाच पराजय झाला. पुढें फिरोजशहा, अहंमदशाहा व अल्लाउद्दीनशाहा ह्यांच्या लढाया देवरायाशीं झाल्या. यापुढें ५९ वर्षें विजयनगरच्या राजांस मुसलमानांनीं त्रास न दिल्यामुळें बरीच विश्रांति मिळाली. ह्या काळांत शिवराय नांवाचा राजा राज्य करीत होता, असें फेरिस्ता म्हणतो. पुढें नरसिंहदेवराय राजा असतां, त्याचा प्रधान अप्पाजी म्हणून होता. नरसिंहरायानें राज्यास पुष्कळ

बळकटी आणिली. तिमराज म्हणून दुसरें एक नांव फेरिस्त्यानें नमूद केलें आहे, तो नरसिंहरायाचा प्रधान असावा. नरसिंहरायाचा मुलगा कृष्णराय हाही चांगला पराक्रमी झाला. ह्याच्या कारकीर्दींत विजयनगरच्या राज्याचा विस्तार फार झाला. अप्पया दीक्षित हा प्रसिद्ध विद्वान् गृहस्थ कृष्णरायाचे पदरीं होता. त्याचा दिवाण तिमराज ह्यानें विजापूरच्या आदिलशाहाशीं पुष्कळ लढाया मारिल्या. ह्या तिमराजानें पुढें सर्व अधिकार बळकाविला. तिमराजाचा मुलगा रामराज राज्य करीत असतां १५६४ त सर्व मुसलमान राजांनीं त्याजबरोबर युद्ध करून तालिकोटच्या लढाईंत त्याचें बहुतेक राज्य हरण केलें. तिमराजानें खऱ्या वारस राजास कैदेंत ठेविलें होतें. रामराज, तिमराज व व्यंकटाद्रि हे तिघे भाऊ होते. तालिकोटच्या लढाईंत विजयनगरचें राज्य बुडाल्यामुळें रामराजाचा भाऊ व्यंकटाद्रि ह्यानें सात दिवसांच्या मजलेवर पेणकोंडा येथें गादीची जागा करून तेथें कांहीं दिवस लहानशा प्रदेशावर राज्य केलें. तेथेंही मुसलमानांनीं त्यास त्रास दिल्यामुळें तो चंद्रगिरीस पळून गेला. व्यंकटाद्रीचा मुलगा रामराय ह्यानें कांहीं प्रांतावर अंमल चालू केला. तो सात पिढ्यांपर्यंत चालला. ह्याच चंद्रगिरीच्या राजांकडून इ० स० १६३९ त मद्रास शहर ईस्ट इंडिया कंपनीस मिळालें. विजयनगरच्या राज्यांत जे जहागीरदार होते, त्यांस नायक असें म्हणत. ह्याच नायकांपासून मद्रास इलाख्यांतील पाळेगारांची व म्हैसूरच्या महाराजांची उत्पत्ति आहे. विजयनगरचा आणखी एक वंशज अनागोंदी येथें राज्य करीत असून तो हैदराबादच्या निजामाचा ताबेदार आहे. मांजराबाद येथेंही एका शाखेचा अंमल फार दिवस होता.

सन १७५६ सालीं तिरमलराय अधिकारापन्न असतां त्याचा मुलूख हैदरअल्लीनें जिंकून घेतला होता, तो त्यानें पुनः परत मिळविला. टिपूचें राज्य इंग्रजांनीं घेतल्यावर तिरमलरायाचा मुलूख कंपनी व निजाम ह्यांनीं वांटून घेतला, व तिरमलरायास दरमहा १५०० रुपये नेमणूक करून दिली. तरी निजामानें आपल्याकडे आलेल्या मुलुखापैकीं अनागोंदी शहर व सभोंवतालचा कांहीं प्रदेश तिरमलरायाकडे जहागिरीदाखल ठेविला. तिरमलरायाचा पुत्र रामराय हा अल्पवयी असतां इ० स० १८२९ सालीं मरण पावला; तेव्हां जहागीर व नेमणूक कमी झाली आणि पुढें ह्या घराण्याचा आतां मागमूसही राहिला नाहीं !

गोविंद सखाराम सरदेसाई.

---

## १२. तारापुंज आणि तारागुच्छ.

अंतरिक्षांतील देखाव्यांचें अवलोकन करीत असतां कित्येक ठिकाणीं कांहीं तारे मिळून स्पष्ट पुंज झाले आहेत असें आपण पाहतों. ज्यांनीं सप्तर्षींच्या ताऱ्यांचा पुंज पाहिला नाहीं, किंवा ज्यांस मृगनक्षत्रांचा पुंज माहीत नाहीं असे गृहस्थ असले तर फारच थोडे असतील. असे पुंज अंतरिक्षांत थोडके आहेत. हे पुंज पाहून त्यांस ओळखण्याकरितां कांहीं परिचित वस्तूंच्या, प्राण्यांच्या किंवा व्यक्तींच्या आकारसादृश्याची कल्पना करून त्यांचीं नांवें या पुंजांस देण्याची चाल फार प्राचीनकाळापासून पडली आहे. ज्यांस अशीं नांवें देण्यांत आलीं आहेत आणि ज्यांविषयीं बरीचशी माहिती मिळाली आहे, असे पुंज २००।३०० निघतील ! या

सर्वांचें वर्णन अर्थात् विस्तारभयास्तव आम्हांस येथें देतां येत नाहीं. म्हणून प्रसिद्ध अशा तीन चार तारापुंजांविषयीं मात्र थोडीशी माहिती सांगतों.

सप्तर्षींचा पुंज सर्वांस माहीत आहेच. यांत प्रथमदर्शनीं सात ठळक तारे दिसतात. प्राचीन काळच्या सप्तर्षींचा महिमा सर्वत्र प्रसिद्ध आहेच. तेव्हां, यावरून या पुंजाचे ठायीं सप्तर्षींची कल्पना करून यास तेंच नांव दिलें आहे. या पुंजाची चांगली माहिती असणें अनेक कारणांनीं इष्ट आहे. साधारण चौरस आकृति करितां येते असे जे या पुंजांतील पुढील चार तारे आहेत, यांपैकीं पुढल्या दोन ताऱ्यांस ध्रुवदर्शक तारे असें म्हणतात. कारण कीं, या दोन ताऱ्यांपासून सरळ रेघ काढिली असतां ती थेट ध्रुवनक्षत्रावर जाऊन पोंचते, आणि या रीतीनें ध्रुवनक्षत्र सहज ओळखितां येतें. या पुंजास युरोपांतील लोक ग्रेट बेअर म्हणजे बृहदृक्ष ( मोठें अस्वल) असें म्हणतात. कारण, तिकडील लोकांनीं या पुंजांतील ताऱ्यांची एका मोठ्या अस्वलाच्या आकृतीसारखी आकृति बनते अशी कल्पना केली आहे. यांतील पाठीमागील तीन ताऱ्यांपैकीं मधला तारा दुर्बिणींतून सुंदर जोडतारा दिसतो. दुर्बिणीनें पाहिलें असतां यांत शेंकडों तारे आहेत असें दृष्टोत्पत्तीस येतें !

देवयानी या नांवाचा एक पुंज उत्तरगोलार्धांत आहे, या पुंजास युरोपांतील लोक अंड्रोमीडा म्हणतात, आणि यास देवयानी हें नांव कै० बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांनीं दिलें आहे. या पुंजाचे साधारण मध्यभागीं एक पांढुरकी लहानशा ढगासारखी आकृति नुसत्या डोळ्यांनीं दिसते. हीच आकृति चांगल्या दुर्बिणीनें

पाहिली असतां कांहीं विलक्षण देखावा दृष्टीस पडतो. या पुंजाच्या मध्यभागीं जो एक मोठा विस्मयकारक धूमपुंज आहे त्याची ही आकृति आहे. याविषयीं पुढें सविस्तर सांगण्यांत येईल.

हिंवाळ्यांत काळोख्या रात्रीं अंतरिक्षांत तारे पाहण्यास लागलें असतां आपलें लक्ष एका भागाकडे चटकन् जातें. कारण, ह्या वेळीं ह्या भागाला एका तारापुंजामुळें फारच सुंदर शोभा आलेली दिसते. हा पुंज मृगनक्षत्राचा होय. पौषाच्या किंवा माघाच्या महिन्यांत आकाश बहुधा निरभ्र असतें. या महिन्यांत काळोख्या रात्रीं हा तारापुंज फारच रमणीय वाटतो. तो इतका कीं, यासारखा सुंदर तारापुंज अंतरिक्षांत दुसरा एकही पाहण्यांत येत नाहीं. शिवाय, या पुंजाच्या किंचित् खालच्या बाजूस लुब्धक हा अत्यंत तेजस्वी तारा लकाकत असतो, आणि वरच्या बाजूस रोहिणीचा लाल तारा चमकत असतो. याप्रमाणें या पुंजाजवळ दुसऱ्या पुंजांतील कांहीं अत्यंत तेजस्वी तारे एकाच क्षणीं दृष्टीस पडतात. म्हणून अंतरिक्षाचा हा भाग हिंवाळ्यांत फारच चित्तवेधक वाटतो. आणि याकडे कितीही पाहिलें तरी आणखी पाहावेंसें वाटतें. या पुंजाच्या चारी बाजूंच्या कोपऱ्यांवर चार ठळक तारे आहेत, आणि त्यामुळें एक कांहींशी चतुष्कोण आकृति बनलेली दिसून येते. या चतुष्कोणाकृतीमध्यें ठळक तीन तारे दृष्टीस पडतात. आणखी या ठळक तीन ताऱ्यांच्या खालीं जे दुसरे तीन तारे दिसतात, त्यांपैकीं मधल्या ताऱ्याजवळ एक अत्यंत मनोहर धूमपुंज दुर्बिणींतून दिसतो. याप्रमाणें अनेक कारणांस्तव हा तारापुंज सामान्य जनांस व विद्वान् पंडितांस प्रिय होऊन बसला आहे. या पुंजाप्रमाणेंच बारा

राशींचे पुंज आणि इतर तारापुंज सूक्ष्म अवलोकन करून ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत.

या सर्व पुंजांखेरीज आणखी अनेक तारापुंज दुर्बिणीच्या साह्यानें कळून आले आहेत. या जातीच्या पुंजांचें स्वरूप कांहीं विलक्षणच असतें. असंख्यात तारे मिळून हे पुंज बनलेले असतात; आणि म्हणून यांस तारागुच्छ हें नांव अधिक शोभतें. हे तारागुच्छ बहुधा नुसत्या डोळ्यांनीं दिसत नाहींत; आणि जे कांहीं दिसतात त्यांचा देखावा एकाद्या लहानशा ढगाच्या तुकड्याप्रमाणें दिसतो. ह्यांकडे दुर्बिणींतून पाहिलें म्हणजे सहस्रावधि तारे एकवटून जमा झाले आहेत, असा अपूर्व देखावा पाहण्यास सांपडतो. हा तारागुच्छ पाहून असा भास होतो कीं, नीलवर्ण आकाशपटावर लक्षावधि मोत्यें एकत्र करून ही एक रास केली आहे, किंवा शुभ्र पांढऱ्या अशा पुष्पांचा हा एक मनोहर गुच्छच केला आहे !

मल्हार खंडेराव चिटणीस.

---

## १३. स्तुतिस्पृहा.

वास्तविक पाहतां मनुष्याची कर्तृत्वशक्ति ती किती ! ज्ञान तें काय ! त्याच्या अंगीं गुण किती थोडे ! मनुष्य असा क्षुद्र प्राणी असतां स्वतःचें अल्पशक्तित्व, अज्ञान, गुणहीनत्व, हें तो पक्केपणीं जाणत असतांही त्यानें प्रशंसेची इच्छा धरून तदर्थ उद्योग करीत असावें हें किती अप्रयोजक वाटतें ! ईश्वरानें सर्व सृष्टि निर्माण करण्यांत जें अपार चातुर्य प्रकट केलें आहे, व अनंत गुण व ऐश्वर्य हीं दाखविलीं आहेत, त्यांपुढें मनुष्याची गणना करूं लाग-

त्यास तो अगदीं क्षुद्रवत् भासतो. परंतु जर आपण मानवजातीविषयींच विचार करूं लागलों तर मनुष्यांमनुष्यांत मोठी तफावत दृष्टीस येईल. कित्येक मनुष्यें इतरांपेक्षां ज्ञानसंपन्न असतात; तसेंच त्यांच्या अंगीं गुण, सामर्थ्य हींही इतरांपेक्षां पुष्कळ असतात. जे सुज्ञ असतात, त्यांस आपलें ज्ञान किती थोडें म्हणून संकोच वाटतो; परंतु जे मूर्ख असतात, ते आपले दोष लक्षांत न आणतां आपल्या अल्प गुणांवरच लक्ष देऊन अहंकारानें फुगतात, व दुसऱ्यांत जे दोष त्यांस आढळतात, ते आपणांत नाहींत म्हणून आपणास मोठे मानतात! सुज्ञ मनुष्य जें कृत्य करतो तें त्याच्या मनास पसंत वाटलें म्हणजे त्यास समाधान वाटतें; परंतु मूर्खांच्या मनास इतरांच्या प्रशंसेशिवाय संतोष वाटत नाहीं. आतां लोकप्रशंसेनें मनास जे अहंकारादि विकार होतात, ते जरी चांगले नाहींत, तरी लोकांनीं आपणास वाखाणावें या इच्छेपासून अनेक वेळां चांगल्या गोष्टी घडून येतात. जो मनुष्य ही इच्छा धरतो तो नीच व निंद्य कृत्यांचा तिरस्कार करूं लागतो; व त्याच्या मनाची स्तुत्य व मोठ्या कृत्यांकडे प्रवृत्ति होते. पहा, जेव्हां एकादा मनुष्य मोठमोठ्या शूरांचीं, महाकवींचीं, व अत्युदार परोपकारी पुरुषांचीं वगैरे चरित्रें वाचतो किंवा त्यांची कीर्ति ऐकतो, तेव्हां त्यांप्रमाणें आपणही लोकांत मान्यतेस चढावें अशी त्यास सहज इच्छा उत्पन्न होते व त्या पुरुषांचें आपल्या कृतींत तो अनुकरण करूं लागतो. त्या पुरुषांचे श्लाघ्य गुण त्याच्या मनांत ठसून जाऊन त्यांविषयीं त्यास आवड वाटूं लागते व ते आपल्या अंगीं येण्याविषयीं तो मनापासून झटूं लागतो. याप्रमाणें झाल्यावर जर तो मनुष्य

दृढनिश्चयाचा असेल तर तोही तसाच कीर्तिमान् पुरुष होतो, यास उदाहरणें इतिहासांत हवीं तितकीं सांपडतील, फार तर काय, जितके म्हणून लोक मोठ्या योग्यतेस चढून विख्यात होतात, त्यांपैकीं बहुतेकांच्या उत्कर्षास प्रायः हीच प्रशंसेची आवड कारणीभूत होते. इतिहासांत पुष्कळदां बापसवाई बेटा झाल्याचीं उदाहरणें आढळतात. फिलिप नामक मासिदनच्या राजानें सर्व ग्रीस देश आपल्या सत्तेखालीं आणला, पण त्याचा पुत्र शिकंदर बादशहा यानें तर पर्शियन लोकांचें वैर फेडायाचें काम जें आथीनियन, स्पातर्न वगैरे कोणत्याही लोकांच्या हातून घडलें नाहीं, तें करून वायव्य दिशेकडून हिंदुस्तानांत चालून येऊन थेट गंगानदीपर्यंत मुलूख काबीज केले; व एके दिवशीं हा रडूं लागला असतां त्यास कोणी खेदाचें कारण विचारलें, तेव्हां तो म्हणाला कीं, 'पृथ्वीवर आणखी देश असते तर बरें होतें, आतां काबीज करायास कांहींच उरलें नाहीं, म्हणून मला दुःख वाटतें!' असा अद्वितीय शूर तो होऊन गेला. याप्रमाणेंच, कार्थेजिनियन लोकांचा प्रसिद्ध सरदार हानिबाल, व त्याचा प्रतिस्पर्धी सिपिओ आफ्रिकेनस्, यांच्याही उदाहरणावरून हीच गोष्ट सिद्ध होते कीं, जगांत मोठेपणा पावण्यास प्रथमतः कीर्तीचा लोभच कारण होतो. आतां अशीं उदाहरणें महा विद्वान् लोकांत फारशीं आढळत नाहींत; कारण, शौर्यादि गुण जसे बापापासून लेकास येऊं शकतात, तसे विचारशक्ति वगैरे मनाचे धर्म फार करून येऊं शकत नाहींत. असो.

लोकप्रशंसेस भुलून तिच्या पाठीस लागणें हें मनाच्या दौर्बल्याचें दर्शक होय. त्यावरून असें समजतें कीं, अशा मनुष्यास

सदसत् गोष्टींचा निर्णय स्वतः करवत नाहीं. किंवा हा निर्णय करितां येत असला तरी त्याप्रमाणें न वागतां केवळ लोकस्तुतीच्या लोभानें किंवा लोकनिंदेच्या भयानें तो वर्तन करतो. जे खरे लोक असतात ते लोकांच्या स्तुतीस किंवा निंदेस अगदीं मानीत नाहींत. त्यांच्या बुद्धीनें त्यांस जी गोष्ट सत्य किंवा न्यायाची वाटते तीसच ते अनुसरतात; इतकेंच नव्हे, तर त्यांस आपल्या सत्कृत्यांस कोणीं नांवाजलें तर अगदीं खपत नाहीं. कारण त्यांचा तसा कांहीं हेतु मुळींच नसतो. तथापि असे पुरुष फार विरळा. व्यवहारांत पाहिले असतां ज्याला त्याला आपल्या स्वार्थाशिवाय दुसरा हेतु नसतो. कित्येक तर स्वार्थाकरितां परहिताचा नाश करण्यासही मागेंपुढें पहात नाहींत. मग आपल्या स्वार्थांतून मन काढून दुसऱ्याकरितां कळवळणारे व दुसऱ्याच्या सुखांत आनंद मानणारे असे पुरुष किती सांपडणार ? सर्व जगांतील मनुष्यांस आपल्या बांधवांप्रमाणें मानणारे, व निस्पृहपणें त्यांच्या सुखाकरितां आपणांवर दुःखें कोसळलीं तरी त्यास न जुमानणारे असे पुरुष केवळ ईश्वरस्वरूपच होत. तुकारामानें म्हटलें आहे:—

जे का रंजले गांजले, त्यांसि म्हणे जो आपुले १
तोचि साधु ओळखावा, देव तेथेंचि जाणावा २
ज्यासि आपंगिता नाहीं, त्यासि धरी जो हृदयीं ३
दया करी जे पुत्रासी, तेचि दासा आणि दासी ४
तुका म्हणे सांगों किती, तोचि भगवंताची मूर्ति ५

या तोडीचीं जीं रत्नें आपल्या या हिंदुस्तान देशांत होऊन गेलीं त्यांत अर्वाचीन काळांत विशेष वर्णन करण्यासारखें म्हटलें म्हणजे प्रसिद्ध अहिल्याबाई होय. ह्या साध्वीनें परोपकारबुद्धीनें आपल्या देशाच्या हितार्थ जीं या देशभर आपलीं स्मारक कृत्यें करून ठेविलीं आहेत त्यांचें व राज्यकारभारांत दक्षता, प्रजेचे ठायीं मातृवात्सल्य, ईश्वरभक्ति इत्यादि जे अनेक उज्ज्वल गुण तिच्या अंगीं होते, त्याचें स्मरण झालें असतां कोणत्या देशाभिमानी हिंदूस आपण धन्य आहों असें वाटणार नाहीं ? असे अलौकिक गुण हिचे अंगीं असतांही ही अगदीं निस्पृह होती; व राज्याचा अंमल आपणास ईश्वरानें दिला आहे, व त्यासमोर त्याचा हिशेब आपणास द्यावा लागेल, असें ती समजत असे !

कृष्णशास्त्री चिपळूणकर.

------

## १४. पुणें दरबारांतील दुफळी.

पुणें दरबारांत देशस्थ व कोंकणस्थ अशा मुत्सद्यांच्या दोन फळ्या होत्या. आम्ही ज्या काळाविषयीं लिहीत आहों तितक्यापुरतें पाहिलें तर या फळ्या देशस्थांच्या व कोंकणस्थांच्या म्हणण्यापेक्षां जुन्या पिढीच्या मुत्सद्यांच्या व नव्या पिढीच्या मुत्सद्यांच्या असें म्हणणें बरें. जुन्या पिढींत पुरंदरे मंडळी, गंगाधर यशवंत, नारो शंकर, विठ्ठल शिवदेव वगैरे मंडळी होती, व या फळीचे पुढारी सखाराम बापू असत. नव्या पिढींत मोरोबा फडणवीस, हरिपंत फडके, त्रिंबकराव मामा पेठे, सारे पटवर्धन सरदार, रास्ते वगैरे होते. नव्या पिढीचे पुढारी नाना फडणवीस होते. सामान्यतः जुन्यांचा कल दादासाहेबांकडे होता, व नवी पिढी थोरले

माधवरावांच्या कारकीर्दीत ऊर्जित दशेला आलेली असल्यामुळें त्या पेशव्याविषयीं तिची भक्ति निस्सीम होती. जुन्या पिढीचीं बहुतेक ठळक ठळक माणसें मरून गेलीं होतीं; तरी पण सखाराम बापू एकटे राहिले होते ते सुद्धां नव्या पिढीस भारी होते. नाना फडणविसांच्या हातांत पुण्याच्या आसपासचे सिंहगड, पुरंदर व लोहगड हे किल्ले व पेशव्यांची सारी खासगी मालमत्ता जामदारखान्यासुद्धां होती, व सातारकर छत्रपतींचा बंदोबस्त ह्यांजकडे होता. थोरले माधवरावांचे कारकीर्दीत राज्यांतील मामलतीची घालमेल कित्येक वर्षें ते करीत होते. शिंदे, होळकर व साबाजी भोंसले यांचा विश्वास बापूपेक्षां त्यावरच अधिक होता, हें खरें; पण बापूंच्या, हातांत परराज्यांतील सूत्रें होतीं, व करवीरकर वगैरे संस्थानिक व राज्यांतील जुने सरदार व दरखदार यांवर त्यांचें वजन चांगलें होतें. दादासाहेबांस पदच्युत करण्याकरितां नानांनीं कांहीं व्यूह रचावा तर बापू केव्हा काय करतील हें त्यांस भय होतें. पण बापूंनींच या खटपटींत पुढाकार घेतला, तेव्हां नाना व त्यांचे अनुयायी पटवर्धन, पेठे, फडके वगैरे सरदार, शिवाय बिनीवाले, मेहेंदळे, रामचंद्र गणेश, वगैरे दोहीं पक्षीं उदासीन असणारे सरदार या कूटांत मिळण्यास उशीर लागला नाहीं. हेंच 'बारभाई' चें कूट होय. यांत बाराच असामी होते असें नाहीं. ज्याला ताळ नाहीं, तंत्र नाहीं व जो एकाच्या धोरणानें चालणारा नाहीं अशा कारभाराला बारभाईचा कारभार असें म्हणण्याची चाल आहे, व हेंच निंदाव्यंजक नांव बापू, नाना व मोरोबा इत्यादि मुत्सद्यांच्या कारभारास दादासाहेब, हैदर वगैरे शत्रूंनीं दिलें होतें.

नारायणरावांचा खून झाला तेव्हां त्यांची स्त्री गंगाबाई दीड महिन्याची गरोदर होती. तिचा गर्भपात करण्याच्या खटपटींत आनंदीबाई होती. पण तिची सर्व खटपट व्यर्थ होऊन गर्भ वृद्धिंगत होऊं लागला, तेव्हां बारभाईंस अधिक आशा व उत्साह उत्पन्न होऊन हरतऱ्हेनें गंगाबाईचा प्राण व गर्भ वांचविण्यासाठीं ते जपूं लागले. तिला तीन महिने होऊन गेल्यावर त्यांनीं निश्चय केला कीं, आतां दादासाहेबांस पदच्युत करून गंगाबाईच्या नांवें तूर्त कारभार चालवावा. पुढें तिला पुत्र झाला तर उत्तमच झालें. तसें न होईल तर दत्तक देऊन त्यास पेशवाईच्या गादीवर स्थापावें.

बारभाईंनीं विचार केला कीं, आपला बेत तडीस जाण्यास पैशाचें व फौजेचें साहित्य केलें पाहिजे, व परराज्यांशीं राजकारणें करून त्यांची मदत घेतली पाहिजे. या गोष्टी दादासाहेब पुण्यांतच असल्यावर कशा घडणार ? आपलीं कृत्यें त्यांच्या कानांवर जाऊन ते आपणांस प्रतिबंध करतील. याकरितां ते कोठें तरी स्वारीकरितां बाहेर पडल्याशिवाय आपण उद्योगास लागूं नये.

बारभाई ज्या संधीची वाट पहात होते ती सुदैवानें अकस्मात् प्राप्त झाली. निजामअल्ली पेशव्यांच्या राज्यांत घोंटाळा होण्याची वाट पहातच होता. नारायणरावांचा खून झाल्याचें वर्तमान कळल्याबरोबर त्यानें फौजेची सिद्धता करून मराठी राज्यावर स्वारी केली. त्याचें पारिपत्य करण्याकरितां इकडून दादासाहेबांची स्वारी निघाली. त्यांनीं नाना फडणवीस, सखारामबापू व दुसरे बारभाईंतील मुत्सद्दी यांस बरोबर नेलें होतें. ते पांचसात मजला झाल्यावर एकामागून एक आजारीपणाचा बाहाणा करून परतले.

पुण्यांत आल्यावर सखारामबापू व नाना फडणवीस यांनीं गंगाबाई व पार्वतीबाई यांस शनवारच्या वाड्यांतून काढून पुरंदरावर पाठविलें, व शहरच्या कोतवालास कैद करून गंगाबाईच्या नांवाची शहरांत द्वाही फिरविली. त्यांनीं दादासाहेबांच्या स्वारीबरोबर जे लोक होते त्यांच्या घरीं चौक्यापहारे बसविले, व दादासाहेबांचे पक्षपाती जे जे पुण्यांत सांपडले त्यांस धरून प्रतिबंधांत ठेविलें. गंगाबाई ही राज्याची मालकीण, तिचे कारभारी सखारामबापू व नाना फडणवीस यांच्या हुकुमाप्रमाणें सर्वांनीं वागावें, दादासाहेबांस गादीवरून दूर केलें असल्यामुळें त्यांचा हुकूम कोणीं मानूं नये, अशी सर्व राज्यांत दवंडी पिटविण्यांत आली.

नंतर बापू व नाना यांनीं साबाजी भोंसले नागपूरकर व निजामअली यांशीं राजकारण करून त्यांस अनुकूल करून घेतलें. निजामअलीची व दादासाहेबांची बेदरावर गांठ पडून लढाई झाली, तींत निजामअलीचा पराभव होऊन त्यास दादासाहेबांस शरण जावें लागलें. नंतर साबाजी भोंसले दादासाहेबांवर चालून येऊं लागले. तेव्हां त्यांचें पारिपत्य करण्याकरितां दादासाहेबांनीं त्रिंबकराव मामांस फौज बरोबर देऊन रवाना केलें, व आपण हैदरअलीवर स्वारी करण्याकरितां कर्नाटकांत शिरले. बापू व नाना यांनीं दादासाहेबांच्या फौजेंत फितूर करून भवानराव प्रतिनिधि, मुराररराव घोरपडे सेनापति, वामनराव पटवर्धन मिरजकर, व दुसरे लहान मोठे सरदार वश करून घेतले. ही फितुराची बातमी, व

पुण्यास चाललेल्या खटपटी, दादासाहेबांच्या कानीं येतांच त्यांनीं मोहीम तहकूब करून पुण्याकडे स्वारीचा रोंख फिरविला.

विश्वनाथ काशिनाथ राजवाडे.

---

## १५. प्रयत्नवाद.

" प्रयत्नांतीं परमेश्वर " ही म्हण सर्वांच्या तोंडीं आहे, आणि हिचा प्रत्यय नेहमीं येतो. मनुष्यास फार दिवसांच्या अनुभवानें झालेलें ज्ञान या म्हणीच्या थोडक्या शब्दांनीं व्यक्त केलें आहे. मनुष्याच्या अंगची योग्यता वाढण्यास खरोखर कारण म्हटलं म्हणजे स्वतःचा प्रयत्न होय. दुसऱ्यावर अवलंबून राहून कांहीं उपयोग नाहीं. स्वतःच्या उद्योगावर प्रत्येक मनुष्याचा भरंवसा असेल तरच त्याच्या अंगीं खरी योग्यता येईल. दुसऱ्यावर अवलंबून न राहतां स्वतःच्या प्रयत्नावरच भरंवसा ठेवून चालणारे लोक पुष्कळ असले, म्हणजे देश निःसंशय प्रबल होतो. कारण इतर लोक त्यांचा कित्ता घेऊन चालतात. ज्या देशांत अशा प्रकारचे लोक नसतात, तो देश अगदीं निर्बल आणि पराधीन असतो. तेथील लोकांस स्वतः प्रयत्न करणें म्हणजे काय हें मुळींच ठाऊक नसतें. दुसऱ्यावर अवलंबून राहून त्यांचें साहाय्य घेण्याची आपणांस संवय लागली तर बहुतकरून आपण निःशक्त होतों. कारण लोकांचें वरचेवर साहाय्य घेतल्यानें स्वतःच्या उद्योगानें आपला निर्वाह होईल असा आपणांस भरंवसा राहात नाहीं; आणि भरंवसा नसला म्हणजे अर्थात् पुनः आपण दुसऱ्याचें साहाय्य मागतों असें वारंवार केल्यानें आपण निर्बल होतों. पण स्वतःवर भरंवसा असला तर आपली शक्ति निःसंशय वाढते. कारण, लोकांवर आपण भरंवसा

ठेविला नाहीं, म्हणजे आपण स्वतःच आपलें काम करण्याचा प्रयत्न करितों. प्रयत्न करण्याची अशी संवय झाल्यानें आपली शक्ति निःसंशय अधिक होते. एक मनुष्य असो किंवा लोकसमूह असो, त्याजकरितां जें जें कांहीं दुसरें कोणी करील, त्या त्या योगानें तें करण्याची कांहीं अंशीं त्याची स्वतःची प्रवृत्ति कमी होते व त्यास तें करण्याची आवश्यकताही वाटत नाहीं. आपणामध्यें अशी एक म्हण आहे कीं, "चालत असल्यास कडेवर कां घ्या?" पण आपण असें समजूं कीं, एक लाडकी आई मुलास चालतां येत असूनही कडेवर घेऊन फिरते. अशी संवय त्या मुलास लागली म्हणजे तें कडेवरूनही कधीं उतरणार नाहीं. कारण आई जर त्याला कडेवर घेऊन फिरते तर तें मूल कशासाठीं मुद्दाम उतरून चालूं लागेल? असें असलें म्हणजे मग त्यास स्वतः चालण्याची कधीं इच्छा होत नाहीं, आणि कधीं आवश्यकताही वाटत नाहीं. यावरून असें उघड दिसून येईल कीं, एकाद्याचें काम जर कोणीं केलें तर तो निरुद्योगी होतो आणि त्याचे अंगीं चपलता म्हणून कांहीं रहात नाहीं. याजकरितां अवश्य आहे त्यापेक्षां जर सरकारानें लोकांकडे अधिक लक्ष पोहोंचविलें, म्हणजे त्यांचें सर्व काम जर सरकारानें पतकरिलें, तर ते निःशक्त होतात. एका व्यक्तीविषयीं जें वर सांगितलें तेंच लोकसमूहाविषयीं समजावें.

व्यवस्था कितीही चांगली असली तरी स्वतः उद्योग न केल्यास तिजपासून विशेष साहाय्य होतें असें नाहीं. उदाहरणार्थ एक चांगली शाळा घेऊं. तेथील गुरु, उपगुरु जरी विद्वान् असले, तरी नुसता त्यांजवर भरंवसा ठेवून विद्यार्थ्यांस कांहीं फायदा होणार

नाहीं. त्यांनीं स्वतः परिश्रम केलेच पाहिजेत, नाहीं तर गुरु सांगेल तें व्यर्थ जाईल. गुरूच्यानें किंवा उपगुरूच्यानें इतकेंच करवेल कीं, ते विद्यार्थ्यांस अभ्यासाचीं साधनें मिळवून देतील; पण त्यांची बुद्धि परिपक्क दशेस आणणें हें गुरूच्यानें किंवा उपगुरूच्यानें व्हावयाचें नाहीं. तें विद्यार्थ्यांचें स्वतःचें काम आहे. याप्रमाणें कायदेकानू चांगले करून राज्यांत नीट व्यवस्था ठेविली तर तेवढ्यानेंच प्रजेस फारसें साहाय्य मिळतें असें नाहीं. त्याजपासून फार तर इतकेंच हित होतें कीं, स्वतःची स्थिति सुधारण्याचें प्रत्येकाच्या हातीं असतें. मनुष्यानें स्वतः प्रयत्न केला तर त्याची स्थिति सुधारेल, नाहीं तर नाहीं. कितीएक लोकांचा असा समज असतो कीं, सरकार चांगलें असलें म्हणजे आपलें कल्याण होईलच. तें आपल्या स्वतःच्या प्रयत्नाशिवाय संपादितां येत नाहीं, असें ते समजत नाहींत. कायदेकानू चांगले असले म्हणजे तेवढ्यानेंच लोकाची मोठी सुधारणा होते असें ते म्हणतात. पण यात बरीच अतिशयोक्ति आहे. खरोखर पाहिलें असतां नुसत्या कायद्याकानूंनीं फारशी सुधारणा होत नाहीं. होते असा समज आपल्या देशांतच आहे असें नाहीं. सुधारणेचें आगर जो इंग्लंड देश, तेथेंही या मताचा प्रसार अजून बराच आहे. त्या देशांत पार्लमेंट सभेकरितां कांहीं नियमित वर्षांच्या अंतीं प्रतिनिधि नेमिले जातात. ही सभा कायदेकानू करते म्हणून ज्यावेळीं प्रतिनिधि नेमण्याचा प्रसंग येतो, त्यावेळीं अमुक एका गृहस्थाच्या तर्फेनें मत देऊन तो सभासद झाला, म्हणजे कायदेकानू करण्यांत एक हजारावा तरी आपला हिस्सा आहे असें समजण्यांत तिकडील लोकांस

मोठा अभिमान वाटतो. परंतु हा अधिकार असल्यानें मनुष्याची खरी योग्यता वाढते असें नाहीं. शिवाय दिवसेंदिवस असें स्पष्ट होत आहे कीं, लोकांचें कल्याण करणें किंवा लोकांचा फायदा करून देणें, हें सरकारचें खरें काम नव्हे. प्रजेचें नुकसान होऊं न देणें आणि त्यांस शत्रूपासून पीडा होत असली तर ती नाहींशी करणें हें राज्यकर्त्यांचें कर्तव्यकर्म होय. जीव, धन आणि स्वातंत्र्य यांचें संरक्षण करणें हें मुख्यत्वेंकरून त्यांचें काम आहे. याशिवाय दुसरें नाहीं. असा कायदा करितां येणार नाहीं कीं, त्याच्या योगानें मनुष्य आळशी असेल तर तो उद्योगी होईल, उधळ्या असेल तर तो बेताबातानें खर्च करील, किंवा दारूबाज असेल तर तो त्या व्यसनांतून मुक्त होईल. कायद्याच्या योगानें जरी असें व्हावयाचें नाहीं तरी मनुष्यानें मनोनिग्रह केला व प्रयत्न केला, तर त्यास उद्योगी, दूरदर्शी व निर्व्यसनी होतां येईल. असें होणें न होणें हें त्याच्या स्वाधीन आहे.

विष्णु मोरेश्वर महाजनी.

---

## १६. प्राचीन पाटलीपुत्र.

[ सर दोराबजी टाटा यांनीं दिलेल्या देणगींतून नदीच्या पुरानें आलेल्या गाळानें जमिनींत गाडलें गेलेलें जुनें पाटलीपुत्र शहर उकरण्याचें काम सांप्रत सरकारमार्फत चालू आहे. 'पाटलीपुत्र' नांवाच्या नवीन हिंदी साप्ताहिकाच्या पहिल्या अंकांत या जुन्या शहराचें वर्णन महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्री, एम. ए., यांनीं दिलें असून त्याचा केसरीपत्रांत छापलेला सारांश आम्हीं खालीं दिला आहे. ]

पाटलीपुत्र हें नगर आशियांतील बाबिलन, पर्सिपोलीस किंवा दमास्कस या प्राचीन काळच्या शहरांइतकें जरी नाहीं तरी बरेंच जुनें आहे. त्या वेळचीं इतर सर्व शहरें नामशेष झालीं, पण पाटलीपुत्र शहर भरभराटींत असून तें हल्लीं राजधानीचेंही ठिकाण झालें आहे. कपिलवस्तूच्या गौतमबुद्धाच्या नांवाशीं या शहराचा बराच संबंध आहे. आपल्या वयाच्या ८० व्या वर्षीं आपल्या आयुष्याचीं शेवटचीं वर्षें कपिलवस्तु नगरांत घालवावीं, या इच्छेनें राजगृहाहून आपल्या जन्मभूमीला बुद्ध येत होता. वाटेंत गंगा व शोण या नद्यांमधील प्रदेशांतून जात असतांना गंगेपलीकडे असणाऱ्या मल्ल, विदेहादि राष्ट्रांपासून आपलें संरक्षण करण्याकरितां मगधाचा सम्राट् अजातशत्रु याच्या ब्राह्मणमंत्र्यानें एके ठिकाणीं तटबंदीचें शहर बांधण्याचें काम चालविलें आहे, असें त्यास दिसलें. बुद्धानें मगध देशांत सारखीं ४१ वर्षें प्रवासांत घालविलीं होतीं व त्या देशांतील कोपरान् कोपरा बुद्धाला माहीत झाला होता, त्यामुळें त्या सूक्ष्म दृष्टीच्या थोर पुरुषाला व्यापाराच्या वगैरे दृष्टीनें या नवीन तटबंदीच्या शहराचें महत्त्व तत्काळ कळून आलें. सर्व जगांत हें मोठें भरभराटीचें शहर होईल (अग्गनगरं भविस्सति), असें त्यानें भविष्य केलें. अग्नि, महापूर, इत्यादिकांचें या शहरास भय आहे, असेंही बुद्धानें त्या भविष्यांत म्हटलें होतें व तें अखेर खरें ठरून महापुरानें या शहराचा पुढें नाश झाला. बुद्धाच्या या पहिल्या भविष्याप्रमाणें तें तटबंदीचें शहर मोठें व्यापाराचें ठिकाण होऊन त्याचा विस्तारही बराच वाढला. मगधदेशाचे सम्राट् पाटलीपुत्राला जाऊन येऊन असत. पण शिशुनाग घराण्याचा नायनाट

करून क्षत्रियवंश नष्टप्राय करण्याचा जेव्हां नंदानें प्रयत्न केला, तेव्हां राजगृह हें संकटाचें केवळ वसतिस्थानच आहे, असें त्यास वाटून त्यानें त्या शहराचा त्याग केला व पाटलीपुत्र हेंच आपल्या राजधानीचें शहर केलें. नंद व मौर्य या दोनही राजघराण्यांच्या छत्राखालीं पाटलीपुत्राची अत्यंत भरभराट झाली. या शहरास साठ दरवाजे व तीनशेंपन्नास बुरूज होते, असें मॅगॅस्थेनिसनें वर्णन केलें आहे. बरेच घोडेस्वार एकमेकांस भिडून दौड करूं शकतील इतकी शहराच्या तटबंदीची भिंत रुंद होती, असेंही तो म्हणतो! मोठमोठे राजवाडे, सार्वजनिक इमारती, नाटकगृहें, जंगी वखारी व भव्य गोद्या त्या शहरांत होत्या, असेंही त्यानें लिहिलें आहे.

अशोकवर्धनानें आपल्या सर्व साम्राज्यांत पशुयज्ञाची मनाई केल्यामुळें साम्राज्यांतील सर्व ब्राह्मणज्ञातीला संताप येऊन गेला व तेव्हांपासून मौर्यघराणें नष्ट करण्याच्या प्रयत्नास सुरवात झाली. अशोकाच्या मरणानंतर अर्ध्या शतकांतच हें साम्राज्य धुळीला मिळालें व त्याच्या प्रत्यक्ष राजधानीतच मोठ्या थाटानें अश्वमेध यज्ञाचा समारंभ झाला! शुंग घराण्यातील सामवेदी ब्राह्मण व सामवेदशाखेचे मोठमोठे आचार्य या चळवळीचे पुढारी होते! पुष्पमित्र नांवाचा एक अलोट बुद्धीचा पुरुष या चळवळीचा प्रवर्तक असून त्याच्याच हातांत पुढें सर्व राजसत्ता गेली. मौर्य घराण्याचे कांहीं अवशेष राहिले होते, पण ते सर्व शुंगाच्याच ताब्यांत होते. शुंगानंतर त्याचे मंत्री काण्वायन यांच्या हातीं सर्व सत्ता आली व पाटलीपुत्र हेंही शहर त्यांच्याच ताब्यांत गेलें. हें

शहर शिक्षणाचें मोठें केंद्रस्थान असून येथें मोठा व्यापारही चालत असे. हिंदुस्तानांतील सर्व लोकांच्या धार्मिक, सामाजिक, नैतिक वगैरेसंबंधाच्या कायदेकानूंच्या प्रवर्तनाचा मूळ उगम या शहरांतच असे. जैन व बुद्ध धर्माचा प्रसार करणारे धर्मोपदेशक याच शहरांतून बाहेर पडले. जैन व बौद्ध धर्मांचीं पीठें या शहरांत होतीं. कौटिल्याचें अर्थशास्त्र, पतञ्जलीचें महाभाष्य, कोहलाचें नाट्यशास्त्र, वात्स्यायनाचें कामसूत्र वगैरे मोठमोठे ग्रंथ याच शहरांत किंवा या शहराच्या आसपासच्या भागांतच लिहिले गेले. काण्वायनानंतर आंध्रसातवाहनांच्या ताब्यांत हें शहर गेलें. हेही ब्राह्मणच होते असें म्हणतात. यांनींही एक शतकभर मोठ्या शांतपणें राज्य केलें. नंतर कनिष्कानें या शहरावर स्वारी करून हें शहर सोडून देण्याबद्दल त्यानें नऊकोट रुपये खंडणी मागितली; पण इतके पैसे देण्याची ताकद नसल्यामुळें शहरवासी लोकांनीं तीन वस्तु त्याला नजर केल्या ! त्यांपैकीं तीन कोटि किंमतीचें बुद्धाचें भिक्षापात्र व अलौकिक बुद्धिमत्तेचा अश्वघोष नांवाचा तत्त्वज्ञही त्यांनीं कनिष्काकडे पाठविला. या अश्वघोषाची त्यांनीं तीन कोटि किंमत केली होती ! नंतर मध्यें बऱ्याच घडामोडी होऊन गुप्त घराण्याचें वर्चस्व हिंदुस्तानांत स्थापन झालें. चार पांच शतकेंपर्यंत पाटलीपुत्र हीच गुप्तांची राजधानी होती. त्या वेळीं उज्जयिनी व अयोध्या अशीं दोन शहरें भरभराटीस आलीं होतीं, तरी पाटलीपुत्रालाच हिंदुस्तानचे लोक मुख्य राजधानी समजत असत. अखिल भरतखंडांतील सुधारणेचें केंद्रस्थान अशी याची ख्याति कायम होती. गुप्तघराण्यापैकीं दोन मोठे पुरुष धर्मपाळ व

देवपाल येथूनच सर्व साम्राज्याचीं राजसूत्रें हालवीत असत. देवपाल या शहराला ‘ श्रीनगर ’—राज्यलक्ष्मीचें वसतिस्थान—असें म्हणे. शोण व गंगा यांच्या संगमाचें कालिदासानें केलेलें वर्णन प्रत्यक्ष पाहून केल्यासारखें दिसतें. यावरून तो या नगरांत बरींच वर्षें असावा असें वाटतें. पाटलीपुत्र हें आपलें पवित्र क्षेत्र आहे, असें जैन लोक मानीत. सतराव्या शतकांत बांधलेल्या एका जैन मंदिरांतील शिलालेखांत पाटलीपुत्राचें नांव आहे. शत्रूपासून स्वसंरक्षण करून घेण्यास हें स्थान फार उपयोगी आहे, ही गोष्ट प्रथमतः जशी अजातशत्रूच्या ध्यानांत आली, त्याप्रमाणें सोळाव्या शतकांतील महंमदीय अजातशत्रूनेंही या शहराचें महत्त्व ओळखून त्याची तटबंदी केली; तो अजातशत्रु म्हणजे शीरशहा होय. हा बिहारमधील एका जहागिरदाराचा मुलगा असून या शहराचा दुसरा संस्थापकच होय. मोंगलांनीं या शहराचें नांव बदलण्याचा प्रयत्न केला, पण तो निष्फळ झाला. अद्यापपर्यंत पाटणा किंवा पाटलीपुत्र हेंच त्याचें नांव कायम आहे. शीरशहापासून ही बहारची राजधानी आहे. शीरशहानंतर गोविंदसिंग खत्री नांवाचा शीख गुरु येथेंच उदयास आला व आपले हिंदी भाषेंतील सर्व ग्रंथ त्यानें येथेंच लिहिले. सतराव्या शतकांत एका विशिष्ट ग्रंथाच्या दृष्टीनें हें शहर प्रसिद्धीला आलें.

---

## १७. पंढरीची यात्रा.

[ कै० न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांनीं पुणें येथील प्रार्थनासमाजांत सन १८८६ सालीं वरील विषयावर व्याख्यान दिलें तें खालीं दिलें आहे. ]

थोड्या दिवसांपूर्वी पंढरपूर येथें मोठी यात्रा जमली होती. त्या यात्रेच्या संबंधानें या शहरांत आळंदी व देहू एथील पालख्या येण्याचा मोठा समारंभ होतो तो सर्वांच्या पाहण्यांत आहेच. तो समारंभ ज्यांनीं लक्षपूर्वक पाहिला आहे त्यांस साधु व महात्मे पुरुष यांविषयीं लोकांत किती पूज्यबुद्धि आहे, हें विशेष रीतीनें कळल्याशिवाय राहणार नाहीं. एथून ज्याप्रमाणें पालख्या जातात त्याप्रमाणें अन्य ठिकाणांहूनही पालख्या व दिंड्या मार्गामध्यें एकत्र मिळून, नंतर पंढरपुराच्या जवळ जवळ गेल्यावर बहुत मोठा समाज म्हणजे सुमारें एक लक्ष मनुष्यांवर लोक हरिनामाचें संकीर्तन करीत शहरांत प्रवेश करितात; व तेथें चार दिवसपर्यंत मोठ्या उत्साहानें भजन करून नंतर आपापल्या घरीं जातात. असा प्रकार शेंकडों वर्षें प्रतिवर्षीं चालू आहे. सर्व जातींचे व महाराष्ट्रांतील सर्व ठिकाणचे लोक अशा दिवसांत हा एवढा लांबचा प्रवास हाल-अपेष्टा भोगीत केवळ भक्तिभावानें करितात ही गोष्ट आपण सर्वत्र ऐकतों व पाहतों. असें असूनही आपणांपैकीं किती थोडे लोक ह्या बाबतींत विचार करतात, याचें अनुमान मनांत काढिलें म्हणजे विस्मय वाटतो. वारकरीपंथाचे जरी आपण अनुयायी नाहीं, तथापि इकडे लाखों लोक दरवर्षीं हा उत्सव नेमानें करितात त्याबद्दल सविस्तर कच्ची माहिती करून घेऊन, त्यांच्या वर्तनापासून आपणांस कांहीं बोध होण्यासारखा आहे किंवा नाहीं, या दोन गोष्टींचा विचार माझ्या मतें आपण अवश्य केला पाहिजे. याकरितां या यात्रेच्या व्यवस्थेची थोडीशी माहिती देऊन त्यापासून आपणांस कोणत्या गोष्टीचा बोध करून घेतां येईल याचा विचार करूं.

आपल्या शहरांतून दोनच पालख्या जातात. एक ज्ञानेश्वरांची आळंदीहून येते व दुसरी तुकारामबोवांची देहूहून येते. ह्या दोन्ही पालख्या गांवांत येण्यापूर्वीं रस्त्यांत मिळून नंतर समारंभानें गांवांत प्रवेश करितात. पुढें येथून सासवड, जेजुरी, वाल्हें वगैरे गांवांवरून नातेंपोतें—माळाशिरसच्या रस्त्यानें पंढरपुरास सुमारें पंधरा दिवसांनीं पोंचतात.

ह्या शहरांत व ज्या ज्या इतर ठिकाणीं यांचे कांहीं लोक थांबतात, तेथें तेथें धर्मखात्याच्या पैशांतून सदावर्तासारखें सर्वांस शिजलेलें अन्न अगर शिधा देण्याची तजवीज लोक आपापसांत करितात.

पुण्यांतून जाणाऱ्या पालख्यांत वाटेनें पैठण येथून एकनाथ साधु यांची पालखी येते ती मिळते. अंमळनेर एथील गोविंदबावा, पैठण येथील रावजीबावा, चोपडें एथील सखारामबावा, अरणभेंडी एथील सांवत्या माळी, तिरेगांवचा गोरा कुंभार, काशीकर कबीर, धामणगांवचे बोधलेबावा, कर्नाटकाचे विठ्ठल पुरंदरे, बोरवणकरबोवा वगैरेंच्या सुमारें पंधरा पालख्या परस्पर पंढरपुरास जातात. प्रत्येक पालखीबरोबर कांहीं स्वतंत्र रीतीनें अशा दिंड्या असतात. दिंड्या म्हणजे भजन करणारांचे जे लहान लहान मेळे एकत्र होऊन दर वर्षीं पंढरपुरास उत्सवाकरितां जातात ते. अशा दिंड्या सुमारें शंभरांवर पंढरपुरीं जातात. त्यांतील मुख्य मुख्य दिंडीवाले लोकांचीं नांवें, कुळ व जात यांची माहिती करून घेणें अवश्य आहे. त्याशिवाय या यात्रेचें खरें स्वरूप ध्यानांत येणार नाहीं. मुख्य मुख्य दिंडीवाले लोकांचीं नांवें व जाती पुढील तपशिलावरून कळतील. ज्ञानेश्वरांचे

पालखीबरोबर मुख्य तीन दिंड्या असतात. तुकारामबोवांचे पालखी-बरोबर दोन दिंड्या असतात, पैकीं एक एकनाथाचे वंशजांची व दुसरी अमृतराय कवि व साधु यांचे वंशजांची असते. आपल्या पुणें शहरांतून ज्या दिंड्या जातात त्यांत मुख्य दिंडीवाले सिद्धेश्वरप्रमुख राममण्डळी यांची दिंडी, पुंडलिक व मुऱ्या महार याची दिंडी, भवानी पेठेंतील खडकतकर व रामा निकम यांच्या दिंड्या, रामा बुरूड व रामा भोपळे माळी यांच्या दिंड्या, तसेंच तुकाराम न्हावी, खंडुजीबावा वाडीकर, लखोबा सोनार, बापू तांबट, श्रीपतीबोवा भिंगारकर, पांडोबा भडभडे, डांगे वगैरे सुमारें वीस दिंडीवाले समाज आहेत. याशिवाय खानदेशांतील मालेगांव, चोपडें, अंमळनेर, सातारा प्रांतांतील कोरेगांव, कऱ्हाड, तासगांव, वाई, कोल्हापूर, मिरज, आजरें येथील गोविंदबावा शेणवई, बेळगांवचे शहापूरकर महादजी पाटील शिंदे व शितोळेकर, लष्करवाले, नागपूरकर, बेलापूरकर, शिरोळकर, तसेंच हैद्राबादकर नारायणबावा, सांवत्या-माळी, गोरा कुंभार, चोखा महार, कर्नाटकांतील विठ्ठल पुरंदरे, काशींतील कबीर, सोलापूर येथील वारकऱ्यांच्या फडांतील चार दिंड्या, पुण्याजवळील पावळ, वाल्हें, तळेगांव, सुपें, केंदूर, नारायणगांव, लोहगांव, चऱ्होली, आळेंबेलें, नासिक, नगर वगैरे ठिकाणच्या दिंड्या, मिळून प्रतिवर्षी जातात.

सदरील तपशिलावरून महाराष्ट्रदेशांतील सर्व ठिकाणचे, सर्व जातींचे, सर्व धंद्यांतील व स्थितींतील लोक आपापला व्यवसाय सोडून व भिन्नपणा विसरून केवळ भक्तिभावानें या कामास प्रवृत्त होतात, असें दिसून येईल. यात्रेचा संप्रदाय असा आहे

कीं, नातेंपोतें, माळशिरस, शेगांव हे तीन शेवटच्या मजलीचे गांव आहेत. तेथें पालख्या व दिंड्या एकत्र मिळून रंगण करतात. म्हणजे पालख्या मध्यें ठेवून प्रत्येक पालखीच्या संबंधानें आलेले दिंडीवाले लोक पाळीपाळीनें भजन करीत प्रदक्षिणा करतात. नंतर सर्व मिळून पंढरपुरास दशमीचे दिवशीं मोठ्या समारंभानें प्रवेश करितात. पुढें नगरप्रदक्षिणा घालून रथ निघतो व अहोरात्र भजन व निरूपण ( अर्थ सांगणें ) करून जाग्रण करितात. नंतर ग्रामस्थांकडून पालख्यांस मेजवानीचे बेत होऊन सर्व पालख्या काल्याच्या दिवशीं गोपाळपुऱ्यांत जाऊन प्रसाद घेऊन नंतर आपापल्या मार्गास लागतात. याप्रमाणें या यात्रेच्या समारंभाची माहिती आहे.

यासंबंधानें आपल्यास विचार करण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, इतके लाखों लोक या पालख्यांविषयीं एवढी पूज्यबुद्धि कां बाळगतात? कोणास असें वाटेल कीं, धर्मभोळेपणाचा हा एक प्रकार आहे. परंतु वास्तविक विचार पाहतां पालख्यांबद्दलची खरी समजूत वेगळीच आहे. पूर्वकाळीं जे साधुपुरुष होऊन गेले, ते जिवंत असतांना यात्रा करण्यास जात असत, तो प्रकार ते मेल्यानंतरही चालू ठेवून, ते जसे कांहीं जिवंत आहेत व यात्रेस जात आहेत अशा समजुतीनें यात्रेकरू लोक त्यांच्या समागमानें यात्रा घडावी म्हणून इतके सर्व हाल सोसतात. साधुपुरुषांनीं देहाचा त्याग केल्यानंतर त्यांचें चरित्र संपतें, त्यांचीं पुस्तकें आपण वाचून उपदेश करून घ्यावा एवढाच त्यांचा व आपला संबंध राहतो, अशी पुष्कळांची समजूत असते. परंतु ही समजूत सर्वांशीं खरी नाहीं.

जे जे साधुपुरुष ह्या अगर अन्य देशांत होऊन गेले त्यांच्यापासून परमेश्वरसाधनाच्या मार्गात आपल्यास पुष्कळ साह्य होण्यासारखें आहे. तें करून घेण्याच्या रीतीनें प्राप्त करून घेतलें पाहिजे. ते ज्या ठिकाणीं रहात होते, परमेश्वराचें भजन करीत होते, ज्या ठिकाणीं त्यांच्या साधुत्वाची विलक्षण कसोटी लोकांच्या नजरेस आली, त्या ठिकाणीं आपण जाऊन त्या सर्व गोष्टी मनांत आणिल्या असतां आपलें मन विशेष गंभीर व भक्तिपर होतें. आपल्यास उपरति होऊन त्या महात्म्यांचें अनुकरण करण्याची दृढ बुद्धि होते. हा लाभ कांहीं लहान नव्हे. ज्ञानदेव, तुकाराम, एकनाथप्रभृति साधुपुरुष आज आपणांमध्यें देहविशिष्टरूपानें वागत असते, तर आपण त्यांचा सन्मान करून त्यांस आपल्या गांवांत आणून त्यांच्या भजनाचा व भक्तीचा लाभ आपल्यास व्हावा म्हणून आपण त्यांचा सहवास केला असता. त्याचप्रमाणें हल्लीं तितक्या अंशानें न झाला, तरी वर दर्शविलेल्या मार्गानें आपण त्यांचा लाभ आपल्यास करून घेतला पाहिजे. तद्वतच हल्लीं जे लोक पालख्यांबरोबर जातात त्यांची समजूत असावी. साधुलोकांच्या परस्पर गांठी पडल्या म्हणजे प्रेम व भक्तिभाव अधिक वाढतो, हा सर्वत्र अनुभव आहे. हा विचार मनांत आला म्हणजे हें धर्मवृद्धीचें साधन आपल्या फारच उपयोगाचें आहे, असें दिसून येईल. आपणांवर नानाविध संकटें येतात, किंवा आपण संशयांत सांपडतों, किंवा आपण मोह पावतों अशा प्रसंगीं परमेश्वराचें साहाय्य मागणें हें जितकें अगत्याचें आहे, तितकेंच जे पुरुष सर्व उपाधींतून मुक्त झाले त्यांच्या चरित्राच्या व अनुभवाच्या आश्रयानें, पुस्तकातून त्यांचे लेख वाचून, तसेंच

त्यांचीं राहण्याचीं व भजनाचीं ठिकाणें पाहून, आपण आपली धर्मबुद्धि वाढवावी, हें आपणां सर्वांस इष्ट आहे. क्षेत्रांत अगर साधुपुरुषांच्या चरित्रांनीं प्रसिद्धीस आलेल्या स्थळीं आपण केवळ क्षणिक वसति केली असतां मनावर जे संस्कार होतात ते अधिक सहवासानें दृढ होतील, हा बोध यात्रेकरूंच्या पालख्यांपासून आपण करून घेण्यासारखा आहे.

आतां दिंड्यांविषयीं विचार करूं. दिंड्या म्हणजे वैष्णवसाधूंचे संघ अगर थवे आहेत. त्यांत जाति, विद्या, अधिकारपरत्वें भेद यात्रेकरू लोक मानीत नाहींत. सर्व आपणांस एकाच परमेश्वराचे भक्त मानितात आणि भक्तिमार्गानें आपली उन्नति होण्याविषयीं झटतात. या लोकांपासून आपल्याला एका गोष्टीचा बोध करून घेण्यासारखा आहे. ती ही कीं, परमेश्वरप्राप्तीचे मार्गास लागल्या-नंतर ते लौकिक, लज्जा, आढ्यता व संकोच या गोष्टी एकीकडे करून गांवोगांवीं, देशोदेशीं, घरांत, देवळांत, एकांतीं, लोकांत, जेथें सवड सांपडेल तेथें, सर्वांस हा उपदेश करितात, त्यायोगानें या देशांतील आग्रहाचा प्रकार पुष्कळ कमी झाला आहे व असा आपणांस अनुभवही आहे. त्यांजवळ जी पताका असते ती ध्वज-रूपी चित्र आहे. तो ध्वज ईश्वरप्राप्तीच्या मार्गास अनुसरणाऱ्या लोकांच्या हातीं दिल्यानें सदैव परमेश्वरास आपण वाहिलों, त्याचे आपण पाईक आहोंत, जेथें जाऊं तेथें त्या ध्वजाचें आरोपण करूं, त्याचें कार्य फत्ते होईल व त्याचा जयजयकार होईल अशी करणी आपल्या हातून व्हावी, याबद्दलची प्रतिज्ञा आपण केली आहे, ही बुद्धि नेहमीं जागृत राहते.

आपल्यासंबंधानें विचार पाहतां हे दोन्ही प्रकार आपणांमध्यें वसावे तसे वसत नाहींत. आपला संकोच, आपली आढ्यता व लोकलज्जेची भीति हीं सर्वांशीं नष्ट होत नाहींत. रस्त्यांतून भजन करीत जाण्याचा आपणांपैकीं पुष्कळांस संकोच वाटतो. त्याचप्रमाणें आपण ईश्वराचे पाईक आहोंत, त्यास आपला देह अर्पण केलेला आहे, ही बुद्धि आपणांत कमी आहे. ह्या दोन्हींसंबंधानें आपण दिंड्यांचें अनुकरण करण्यासारखे त्यांत पुष्कळ गुण आहेत. त्यांचें दिग्दर्शन मात्र येथें केलें आहे प्रत्येकानें आपापल्या ठिकाणीं विचार करून या बाबतींत आपणांस काय कर्तव्य आहे, याचा निर्णय ठरवावा. या उणीवीमुळें आपल्या मतांचा प्रसार होत नाहीं व ह्या साधनामुळें ज्या महाराष्ट्रसाधूंचे लाखों अनुयायी लोक तापीपासून तुंगभद्रेपर्यंत सर्व ठिकाणीं नांदत आहेत त्याच साधुलोकांच्या मतांचा अंगीकार कालस्थितिमानानें आपण करून त्यांचें उदाहरण वर लिहिल्याप्रमाणें आपण घेतलें असतां, आपल्या मनांतील हेतु ईश्वरकृपेनें लौकर सिद्धीस जातील अशी खात्री आहे.

## १८. युरोपांतील सहकारी चळवळ.

सांपत्तिक स्थितीचें अध्ययन म्हणजे मानवजातीच्या नित्याच्या व्यवहाराचा अभ्यास होय, असें एक सुप्रसिद्ध अर्थशास्त्रवेत्ता म्हणतो. आणि या नित्य व्यवहारापैकीं कांहीं भाग व्यवस्थितपणें चालविण्याची जी विद्या तीसच सहकारिता म्हणतात. औद्योगिक व्यवहाराच्या बाजूनें सहकारी चळवळ म्हणजे स्वावलंबी माणसांच्या स्वनियंत्रित धोरणांचें एक मुख्य अंग आहे. सहकारिता ही धर्मार्थसंस्थेप्रमाणें पंगु संस्था नव्हे. ही संस्था अनाथास आश्रय तर

देतेच, पण त्याच्या अंगांतला दुबळेपणा धुऊन काढून त्यास आत्मप्रत्ययाची तीव्र मात्रा देऊन जगाच्या पाठीवर स्वावलंबनपर अशा आयुष्यक्रमांत नव्या नव्या संकटांशीं झगडण्यास सामर्थ्यवान् करते. सहकारितेच्या आश्रयाला जे येतात ते मोठ्या संकटांत स्वतःचा तरणोपाय काढतात, एवढेंच नव्हे, तर आपल्या बांधवांचीही संसारयात्रा सुखमय करण्याला हातभार लावतात.

सहकारितेचा युरोपमध्यें औद्योगिक व्यवहाराशीं नुसता वरवर संबंध नाहीं. तर तो व्यवहार चालविण्याचा ती एक जोरदार मार्ग होऊन बसली आहे. तिकडे औद्योगिक व्यवहाराचें क्षेत्र जितकें व्यापक आहे तितकेंच सरकारी चळवळीच्या अंतःशक्तीचें क्षेत्रही विस्तृत आहे. आतां अजूनही कांहीं विशिष्ट धंद्यांत या तत्त्वाचा शिरकाव झाला नाहीं. एवढेंच नव्हे, तर ते धंदे चालविण्याच्या हल्लींच्या पद्धतीनें संपादिलेलें यश सहकारितेच्या मार्गापेक्षां आजमितीसही जादा आहे. तथापि आज नाहीं उद्यां हे धंदे या तत्त्वाच्या आश्रयानें आज आहेत त्याहीपेक्षां वरच्या पायरीला जातील. सहकारी चळवळींत असेंच कांहीं स्वारस्य भरलेलें आहे.

युरोपांतील या नव्या औद्योगिक अस्त्राचें इतकें गुणवर्णन झाल्यावर ही संस्था आहे तरी काय हें समजावून घेण्याची लालसा सहजच उत्पन्न होते. पण या चळवळीचें पूर्ण लक्षण देण्यापूर्वीं आपण अजमासाअजमासानेंच म्हणजे व्यतिरेकात्मक विचारसरणीनें पल्ला गांठल्यास बरीच समजूत पडेल. प्रथम सहकारिता म्हणजे "एकत्र काम करण्याची पद्धत" असें जर आपण म्हटलें तर निरनिराळ्या व्यवहारांच्या अनेक पद्धतींचा या चळवळीच्या इतिहासांत अन्तर्भाव होईल.

सहकारितेचें वरील लक्षण आपण बरोबर धरून चाललों तर खाणीं-तून लोखंडाचे अशुद्ध कण संशोधून ते लोहाराच्या भट्टींतून जाऊन त्यांचें एक सुबक यंत्र बनण्याच्या संक्रमणावस्थेंत सहकारितेचे किती तरी प्रकार जमेस धरावे लागतील ! खाणींत पुष्कळ मजूर खपतात म्हणून खाणींत सहकारिता होते. वखारींत हे लोखंडाचे पदार्थ सांठवितात म्हणून वखारींत होते, तशीच ती आगगाडीच्या रुळावर होते, ठसे पाडणारांच्या कारखान्यांत होते. प्रत्येक कारखान्यांत नोकरचाकर आपल्या मालकांशीं सहकार्यच करीत असतात. पुनः बाहेर व्यापारकट्ट्यावर असे कित्येक कारखाने, अशीं कित्येक खातीं घेवाणदेवाणरूपानें दुसऱ्या कारखान्यांशीं, दुसऱ्या खात्यांशीं सह-कार्य करीत असतात.

मग हीच जर सहकारिता असेल, तर आपल्याकडे रेलवेवर, जहाजांवर व तागाच्या गिरण्यांत अनेक सांधे दाबणारे, सिग्नलर्स, खलाशी व गिरणीमजूर सहकार्य उपजतच करीत आहेत. युरोप-मधून शिकण्यासारखें त्यांत नवें कांहींच नाहीं. पण ही खरी सह-कारिता नव्हे. परस्पर उपयोगी असे हे अन्योन्य करारमदार आहेत. केवळ पैशानें उभयतांमधील दुवा सांधला आहे. अटी पुऱ्या झाल्या कीं, असले करार विलयास जातात. या करारांची पुनर्घटना करार करणाऱ्या उभयपक्षांच्या मर्जीवर अवलंबून असते. पुनः प्रत्येकाच्या हिताहिताप्रमाणें करार करणाऱ्या दोन बाजूंमध्यें नित्य नवी घडा-मोड होत असते ती वेगळीच.

मग सहकारिता म्हणजे निव्वळ एकत्र काम करण्याची पद्धत नव्हे. त्या पलीकडे ती कांहीं तरी विशेष आहे. पहिल्या करारां-

तील क्षणैरु द्रव्यसंबंधापेक्षां तिच्यांत कांहीं तरी जास्त आहे असें आपण समजूं या. एकादा औद्योगिक कार्यक्रम पुरा करण्याकरितां, किंवा एकादा धंदा यशस्वी करून दाखविण्याकरितां समान हेतूनें बांधलेल्या चारचौघांचा जो समाज तो " सहकारी समाज " असें आपण मानूं या.

हें लक्षण कायम धरलें तर युरोपमध्यें याच तत्त्वावर ज्या अनेक संस्था चाललेल्या आहेत त्या हें लक्षण बरोबर नाहीं, असें सुचवितात. उदाहरणार्थ, तिकडील ' बंधुसमाज ' ' औद्योगिकसंघ ' या संस्था घ्या. विशेषतः ' बंधुसमाज ' ही संस्था निवळ परोपकारार्थ निर्माण झाली असल्यानें सहकारी चळवळीसारख्या औद्योगिक प्रगतीच्या तत्त्वांनीं प्रेरित झालेल्या संस्थांशीं तिचें मुळींच साम्य नाहीं. येथें मूळांतच वैधर्म्य उत्पन्न झालें. बंधुसमाजाचा हेतु फक्त काटकसर व धोरण किंवा श्रीसमर्थ म्हणतात ती दीर्घसूचना म्हणजे दूरदृष्टि शिकविण्याचा आहे. या समाजांत, अकालीं मृत्यु, अपघात, आजारीपण, वार्धक्य या संकटांशीं तोंड देणाऱ्यास हातभार देण्यांत येतो. हा पहिला अडथळा झाला. आपल्या लक्षणावर येणारा दुसरा अतिव्याप्तिदोष म्हणजे " मजुरांचे संघ " या संस्थांचा. कारण ह्या संस्थांचा व्यापारांतल्या घडामोडीशीं संबंध आहे, हें खास. पण कर्मकरसंघ (मजुरांचे संघ—Trade's Unions) स्वतः व्यापार करीत नाहींत, हेंही तितकेंच खरें आहे. मोठमोठ्या भांडवलानें जे उद्योगधंदे चालले आहेत तेथें मजुरांचे व औद्योगिक संघ संभवतात. भांडवलाच्या पायावर उभारलेल्या अनेक धंद्यांत कर्मकरसंघ, मालक आणि मजूर याच्यांतील हितप्रश्न सोडविण्याकरितां, विशेष प्रसंगीं

मजुरांच्या हक्काबद्दल मालकाजवळ भांडण्याकरितां दक्षतेनें शिष्टाई करीत असतात. या संघांत मालकांचा—धंदेवाल्यांचा—भांडवल-वाल्यांचा समावेश होत नाहीं.

वरील अडचणी लक्षांत घेतल्या म्हणजे सहकारितेचें आतांपर्यंत सांगितलेलें व्यवच्छेदात्मक लक्षण लंगडें किंवा अपुरेंच पडतें. युरोपांत नानाप्रकारचे औद्योगिक संघ आजमितीस विद्यमान आहेत, ' ट्रस्ट ' आहेत, ' कार्टेल्स ' आहेत, ' रिंग्ज ' आहेत; नानाप्रकारचे संघ अस्तित्वांत आहेत. पण या सर्व प्रकारच्या संघांत सहकारितेची उदात्त प्रेरणा नाहीं. आतां कांहीं प्रकारचे 'संघ' व कांहीं प्रकारच्या सहकारी संस्था, यांत बरेंच साम्य आढळतें; किंबहुना कित्येक सहकारी उत्पादकसंस्था, कार्टेल् नांवाच्या औद्योगिक संघांशीं न कळत जुळून येतात; परंतु या दोन संस्थांच्या हेतूंत व वातावरणांत महदन्तर आहे. दोन्हीही संस्था आंत गोंवलेल्या व्यक्तींचें हित प्रमुखत्वानें साधतात हें खरें आहे, तरी बहुतेक प्रकारच्या औद्योगिक समिति सशक्तांच्या समिति होत. त्या सशक्तास जास्त सशक्त, अधिक धाडशी, विशेष हट्टी, आग्रही आणि प्रमुखत्वानें एकविशिष्ट, स्वैरसत्ताक, एकलगामी किंवा व्यापाराचीच कक्षा अन्तर्मुख खेंचून धरण्याकरितां निर्माण झाल्या आहेत. उलटपक्षीं सहकारिसंस्था ही दुर्बळाकरितां अवतरली आहे. इच्या धोरणानें जुळलेले गोरगरीब एकजीव होऊन परस्परांचा उद्धार करण्याकरितां झटतात. इतरांच्या अंगांतील दुबळेपणा घालवून त्यांस सामर्थ्यवान् करितात. ' कर्मकरसंघ ' ही एक शक्ति आहे. सहकारिता ही एक उदात्त कल्पना आहे. रॉकफेलरसारख्या कुबेराच्या

कर्तृत्वाविषयीं एकाद्यास जर कौतुक झालें तर व्हॉन्सिटॉर्टसारखे जे वसुधाकुटुंबी उदारचरित असतात त्यांच्याविषयीं आदर उत्पन्न होतो. पुष्कळ उच्चध्येयांच्या इतिहासाप्रमाणें सहकारिता-नलिनीची उत्पत्ति इतर मनोहर चळवळींप्रमाणेंच उपहास व संशयरूपी पंकांतूनच झाली आहे. आणि जेव्हां सहकारी तत्त्वाचा आणि कृतीचा विजयावह मेळ बसला तेव्हां त्या तत्त्वाचा चोहोंकडून बोलबाला झाला. आरंभींच्या धुगधुगीच्या प्राथमिक धडपडीच्या काळांत ज्यांना हें तत्त्व रुचलें नव्हतें अथवा माहीतही नव्हतें त्या सर्वांनीं या वेळेस त्याची तळी उचलली.

सहकारितेच्या वरील लक्षणाशीं पडताळून पाहतां समाईक भांडवलावर निघालेल्या औद्योगिक संस्था सहकारितेच्या सदरांत येत नाहींत. मग तात्त्विक लक्षण सोडून देतां निवळ व्यावहारिक बाजूनें पाहिलें तर सहकारितेची पुरी ओळख पटविणारी खूण काय? व्यावहारिक खूण अशी आहे कीं, जी औद्योगिक दृष्टीनें आपल्या सभासदांइतक्या किंबहुना जास्त दुर्बळ अशा लोकांस, ते शीलाचे असल्यास, आपल्या मंडळीच्या फायद्यांत बरोबरीच्या नात्यानें हक्कदार करते तीच सहकारी मंडळी होय.

मग अखेरीस लक्षण असें ठरलें कीं, सहकारी मंडळी म्हणजे दुर्बळ लोकांनीं समाईक व्यापाराच्या बुद्धीनें काढलेली मंडळी. ही केवळ निःस्वार्थबुद्धीनें चालविलेली असते. इतक्या निःस्वार्थबुद्धीनें कीं, सभासदांच्या नात्यानें तिच्या बिनीखालीं येणाऱ्या सर्वांना, ज्यांनीं ज्यांनीं तिचा जितका जितका उपयोग करून घेतला असेल

त्यांना त्यांना तितक्या प्रमाणांत तीस झालेल्या फायद्याचा वांटा मिळावा.

लोकशिक्षण ( मासिक ).

---

## १९. वसईचा वेढा.

मागुतीं चिमणाजी आप्पा कोंकणपट्टीला स्वारीला निघाले. ते कोंकणांत येऊन, तळा, घोसाळा, अवचितगड, बिरवाडी, करनाळा, रेवदंडा, बेलापूर, साष्टी, असा मुलूख आपले कबज्यांत आणून आपला अम्मल चालता केला. पुढें मुलूख काबीज करावा अशा बेतानें जाऊन वसईला लागले. तेथें पहिला अम्मल फिरंग्याचा. तेव्हां शह जाऊन दिला. परंतु किल्ला समुद्रांत. एक आंग खुष-कीला. त्या समयीं आप्पासाहेब यांणीं जहाजें तयार करून, आर-मार जमवून समुद्रांतून लढाईचा उद्योग केला. तीन वर्षें वसई भांडली. किल्ला हस्तगत होतां दिसत नाहीं. मनुष्यें फार कामास आलीं. नऊ लाख बांगडी फुटली. लढाईचा मोठा प्रसंग केला, परंतु किल्ला हस्तगत होत नाहीं. चिमाजी आप्पा यांचा किल्ला घेण्याचा निश्चय मोठा. तेव्हां सर्व सरदार आपले जमा करून त्यांजला आप्पासाहेब बोलले कीं, "किल्ला हस्तगत होत नाहीं, याजकरितां मजला तोफेचे तोंडी बांधून माझें डोकें तरी किल्ल्यांत पाडावें, नाहीं तर किल्ला घ्यावा !" तेव्हां सर्व सरदार यांणीं आप्पासाहेबांस सांगितलें कीं, " जो आपला निश्चय झाला तोच नेम आमचा आहे; परंतु कांहीं तरी किल्ल्यांतील भेद समजल्या-शिवाय किल्ला हस्तगत होणें कठीण. यासाठीं याचा विचार करून

कांहीं तरी मसलत काढली पाहिजे, मग दुसरा विचार किल्ला घेण्याचा ठरवूं. आधीं किल्ल्यांतील भेद आणावा. ”

तेव्हां सर्व विचार करून खंडोजी माणकर यांस गुराखी करून त्यांनीं किल्ल्यांत जाऊन गुरें राखावयाची चाकरी पत्करली. रोज किल्ल्यांत जाऊन लोकांचीं गुरें चारावयास न्यावीं, आणि फिरून किल्ल्यांत पावतीं करावीं, असा क्रम माणकर यांनीं चालविला. दुसरे आंजुरकर पंचकळसे सुतार सरदार होते त्यांनीं सुतारकाम करावयास किल्ल्यांत जाण्याचें पतकरून रोज किल्ल्यांत जावें आणि लोकांचे घरीं सुतारकाम करावें. दुल्बाजी मोरे सरदार होते, त्यांनीं कासारपणा पत्करून रोज किल्ल्यांतील लोकांचे बायकांस किल्ल्यांत जाऊन बांगड्या भरून बाहेर येत जावें.

याप्रमाणें तिघांनीं किल्ल्याचा भेद आणिल्यावर आपले लष्करांतून सुरुंग खणून किल्ल्याचे बुरुजाखालीं सुरुंग नेऊन त्यांत दारूचे बुधले भरून बत्ती दिली, तेव्हां तो बुरुज उडाला. तो मागुतीं जागचें जागीं बसला. नंतर दुसरा सुरुंग पाडावयास काम चालविलें. त्या समयीं किल्ल्यांतील फिरंगी याची बायको जहाजांत बसून बाहेर निघाली. तें पाहून सरकारचीं जहाजें धांवून फिरंग्यांचें जहाज धरिलें आणि त्या बायकोस श्रीमंतांकडे आणिली, व ती बहुत देखणी, रूपवान् होती म्हणून श्रीमंतांस दाखविली. त्यांनीं पाहून आपले लोकांस बोलले कीं, “ही कशाला धरून आणिली ?” असें बोलून तिला साडीचोळी नेसवून सोडून दिली ! तेव्हां ती माघारे जाऊन आपले नवऱ्यास तिनें वर्तमान सांगितलें, “ तुम्ही

त्याशीं कशासाठीं भांडतां ? तो[1] पुण्यवान् आहे. मी तेथें गेलें असतां मला वांकडे दृष्टीनें पाहिलें देखील नाहीं, तेव्हां त्याशीं लढून यश येईल असें दिसत नाहीं व तुम्हांस दुसरीकडून कुमकही येत नाहीं." असा तिनें उपदेश केला ! याजकरितां गनिमाशीं सल्ला करून स्नेह ठेवून, आपले खटल्यासुद्धां निघून जावें. याप्रमाणें ठरल्यावर फिरंगी यांनीं श्रीमंत यांजकडे बोलणारा पाठवून तह केला कीं, "आमचे पदरीं कारकून आहेत त्यांचा सांभाळ आपण करावा आणि आमची जात आहे त्यांजला आपण हरएक बेगार सांगूं नये; आम्हांस आठ दिवसांची मुदत द्यावी, म्हणजे आम्ही आपला सरंजाम घेऊन जातों, आणि किल्ला तुमचे हवालीं करितों." त्याजवरून आप्पासाहेब यांनीं कबूल करून त्यांचे पदरचे कारकून होते त्यांस दरसाल ३६ रुपये व १५ मण भात याप्रमाणें देऊं, त्यांजकडे कामकाज सांगणार नाहीं, व तुमचे जातीचे लोकांस बिगार सांगणार नाहीं, असें ठरल्यावर फिरंगी यांनीं आपली सर्व वस्तभाव, सारें खटलें, आपले जहाजांत भरून किल्ल्यांतून निघून गेले पुढें आप्पासाहेब यांनीं किल्ल्यांत शिरून भगवे झेंडे चढविले. वसईखालीं नवा लक्षांचा मुलूख होता तितक्या मुलखाचा अम्मल

---

१ चिमाजी आप्पा मोठा निश्चयी असून त्याचा मनोनिग्रह कांहीं विलक्षण होता, असें मस्तानीच्या व प्रस्तुतच्या उदाहरणांवरून उघड होतें. शिवाजी-महाराजांविषयीं असें उदाहरण आहे ( निबंधमाला अंक १३ पृष्ठ २२ ). अशा काळांत व लोकस्थितींत हे पुरुष शुक, भीष्म, मारुती यांचे अवतार असें कोणीं म्हटल्यास शोभणार नाहीं, असें नाहीं.

२ ही हकीकत ग्रांड डफ देत नाहीं. फिरंग्याची बायको हातीं लागली असतां श्रीमंतांनीं तिचा गौरव करून परत किल्ल्यांत पाठविली, ही गोष्ट वसईचे किरिस्ताव लोक अजूनही मोठ्या आवेशानें सांगतात.

चालता केला. असा गुजराथपावेतों अम्मल बसवून श्रीमंत आप्पासाहेब मागुतीं माघारे येऊन वसईवर मुक्काम केला. तेथें आल्यावर लढाईत लोक पडले होते, त्यांस कित्येकांस पालख्या दिल्या, कित्येकांस जमिनी दिल्या व कित्येकांस गांव इनाम दिले. बाल[1]परवेशी पडलेल्या लोकांची चालविली. ज्याला संतति नव्हती त्याची नान[2]परवेशी चालविली. असा सारा बंदोबस्त करून शंकराजी केशव फडके यांजकडे वसई—सरसुभा सांगितला. असा बंदोबस्त करून श्रीमंतांची स्वारी पुण्यास येऊन बाजीरावसाहेब यांस सारा मजकूर सांगून, साताऱ्यास जाऊन शाहूमहाराज यांस भेटून, मुलूख सर केला हा मजकूर महाराजांस सांगून, मागुतीं चिमाजी आप्पा पुण्यास आले.

कृष्णाजी विनायक सोहनी.

---

## २०. दुर्योधन आणि सुंदरक.

[ भारतीय युद्धाच्या गर्दीत एकदां दुर्योधनाचा रथ मोडला; त्याचे घोडे ठार झाले, आणि तो स्वतः जखम लागून मूर्च्छा पावला. तेव्हां सारथ्यानें त्याला दुसऱ्या एका रथांत घालून रणांगणांतून थोड्या अंतरावर दुसरीकडे नेलें. पुढें कांहीं वेळानें दुर्योधन सावध झाला. इतक्यांत समरभूमीवर हातावर शिर घेऊन लढणाऱ्या कर्णाकडून सुंदरक या नांवाचा एक दूत दुर्योधनाचा शोध करीत करीत

---

१ बालपरवेशी—बालपरवर्षा—लढाईत पडलेल्या शिपायांच्या कुटुंबास दिलेले पगार, पेन्शन, गांव, जमीन.

२ नानपरवेशी—लढाईत मयत होऊन वंश नसेल तर बायकोच्याच निर्वाहापुरतें देणें.

तेथें आला. त्या वेळीं दुर्योधनानें युद्धाची हकीकत त्याला विचारली, व ती त्यानें दुर्योधनाला सांगितली. हा विषय खालीं संभाषणरूपानें आला आहे. ]

**दुर्यो०**:--( त्यास पाहून ) अरे सुंदरका, माझा सखा कर्ण खुशाल आहे कीं ?

**सुंदर०**:—महाराज, शरीरानें मात्र खुशाल आहे.

**दुर्यो०**:—( घाबरून ) काय रे सुंदरका, त्या दुरात्म्या अर्जुनानें त्याचे घोडे मारिले किंवा सारथि नष्ट केला, अथवा रथ भग्न केला, झालें तरी काय ?

**सुंदर०**:—महाराज, केवळ रथ भग्न केला इतकेंच नाहीं, तर मनोरथही !

**दुर्यो०**:—काय रे, असें संदिग्ध भाषण करून माझ्या दुःखित मनास आणखी अधिक दुःख देतोस ? काय असेल तें सर्व स्पष्ट सांग.

**सुंदर०**:—आज्ञा महाराज. महाराजांच्या चरणांच्या दर्शनानें आणि मुकुटरत्नांच्या प्रभावानें माझ्या आंगींची शस्त्रवेदना दूर झाली, आतां कांहीं चिंता नाहीं. ( आवेशानें इकडे तिकडे फिरतो. ) ऐकावें महाराज, आज तर कुमार दुःशासनाच्या वधा---( इतकें अर्धें बोलून दांतांनीं जीभ धरून हातानें तोंड झांकतो. )

**सार०**:—सुंदरका, सांग सांग, भिऊं नको. हें तर दैवानें अगोदरच सांगितलें आहे.

**दुर्यो०**:—हूं सांग बाबा आतां. अगोदरच हें माझ्या कानीं पडलें

आहे. दुःशासनाच्या मरणाची कथा म्यां ऐकावी असें आज माझ्या वांट्यांस आलें आहे.

सुंदर०:—बरें तर ऐकावें महाराज. आज तर कुमार दुःशासनाच्या वधामुळें जो आपला सखा स्वामी अंगराज कर्ण तो क्रोधानें संतप्त होऊन, व भोंवया वर चढवून बाण जोडतो केव्हां आणे सोडतो केव्हां हें कोणांस न समजे अशा प्रकारें बाणांचा वर्षाव करीत दुष्ट जो मध्यम पांडव भीमसेन त्यावर धांवून गेला.

दोघे०:—बरें मग पुढें काय ?

सुंदर०:—मग महाराज, दोन्हीकडच्या सैन्यांतील हत्ती, घोडे आणि पायदळ हीं जेव्हां मिसळलीं तेव्हां त्या गर्दींत जो मनस्वी धुरळा उठला तेणेंकरून आणि दोन्ही दळांतील हत्तींच्या प्रेतांचे ढीग जिकडे तिकडे पडले होते तेणेंकरून असा अंधकार माजला कीं, त्यानें दोन्हीं सैन्यें आंधळीं करून टाकिलीं. भूमि किंवा आकाश कांहींच कोणास दिसेना अशी अवस्था झाली !

दोघे०:—मग पुढें !

सुंदर०:—मग महाराज, त्या अंधकारांत बळानें ओढलेल्या धनुष्यांच्या दोरीच्या टणत्काराचे जे गंभीर आणि भयंकर शब्द होत त्यांहींकरून प्रळयकाळच्या मेघांची गर्जना होत आहे काय असें सर्वांस भासलें.

दुर्यो०:—बरें मग पुढें ?

सुंदर०:—मग महाराज, ते दोघे जेव्हां वारंवार मोठ्यानें सिंहनाद करीत, तेव्हां त्या मेघगर्जना वाटत; आणि एकमेकांवर अनेक

प्रकारचीं शस्त्रें टाकीत, तीं कवचांवर आपटून त्यांपासून अग्नि निघे तो विद्युल्लतेसारखा चमके; आणि त्यांच्या आंगापासून जे रक्ताचे असंख्य बिंदु उडत, ते जणूं काजवे उडतात असें वाटे; आणि गंभीर शब्द करणारे त्यांचे चाप ते मेघ; आणि त्यांजपासून जे हजारों शर निघत त्या जणूं जलधारा असें वाटे ! अशा शरवृष्टीनें जेव्हां दशदिशा भरून गेल्या, कोठें कांहीं दिसेनासें झालें, तेव्हां हें समर नव्हे, दुर्दिनच झालें काय असें वाटलें !

दुर्यो०:—मग पुढें काय झालें ?

सुंदर०:—मग महाराज, अशा समयांत अर्जुनानें आपल्या ज्येष्ठ भ्रात्याचा कदाचित् पराभव होईल ह्या शंकेनें त्यास साह्य करण्याकरितां त्वरेनें आपला रथ त्या ठिकाणीं आणिला. त्या रथाच्या घोड्यांचा शब्द विजेच्या कडकडाटाप्रमाणें भयंकर, त्याच्या ध्वजस्तंभीं वानर होता तोही भयंकर, रथाचे घोडे हाकावयास जो धुरेवर वासुदेव बसला होता तोही भयंकर, त्याला भव्य चार हात, त्या चारही हातांत शंख, चक्र, गदा, खड्ग हीं आयुधें, तींही भयंकर; अशा रथांत बसणारा जो रथी वीर अर्जुन तोही भयंकर, त्याजकडे कोणाच्यानें पाहावेना ! येतांच अर्जुनानें देवदत्त शंखाचा आणि वासुदेवानें पांचजन्य शंखाचा जो गंभीर आणि भयंकर ध्वनि केला त्याच्या प्रतिध्वनीनें दशदिशा भरून गेल्या.

दुर्यो०:—मग पुढें काय झालें ?

सुंदर०:—तदनंतर महाराज, भीमसेन आणि धनंजय ह्या दोघांशीं आपला बाप एकटा झगडत आहे असें कुमार वृषसेनानें पाहून त्या ठिकाणीं यावयास त्वरेनें आपला रथ काढिला. त्या

घाईंत त्याचा रत्नखचित मुकुट पडलाच होता पण संभाळला. येतां येतां त्यानें धनुष्यास बाण जोडून धनुष्याची दोरी आकर्ण ओढून उजव्या हातांत बाणाचा पुच्छभाग धरून वेगानें रथ धांवडण्याविषयीं सारथ्यास आज्ञा केली, तोंच रथ येऊन पोहोंचला.

**दुर्यो०**:—(डौलानें) हां, आतां सांग पुढें कसें काय झालें तें.

**सुंदर०**:—मग महाराज, कुमार वृषसेनानें येतांच अगोदर तेजस्वी, कठीण आणि तीक्ष्ण अशा बाणांनीं अर्जुनाचा एवढा रथ पण जसा एकादा पुष्पित वृक्ष भ्रमरांनीं आच्छादित होतो तसा क्षणांत आच्छादून टाकिला.

**दोघे०**:—( हर्ष पावून ) एकूण वृषसेनानें असा पराक्रम केला ना ! बरें पुढें काय झालें ?

**सुंदर०**:—मग महाराज, तें कुमाराचें चापल्य पाहून अर्जुनानें तीक्ष्ण बाणांची वृष्टि करीत किंचित् हास्य करून वृषसेनास म्हटलें, 'अरे बाळा, वृषसेना, माझ्यापुढें उभें राहणें तुझ्या बापालाही अशक्य, मग तुला लेंकराला कसें योग्य होईल ? तर जा, आणि आपल्या बरोबरीचे कुमार पाहून त्यांच्याशीं युद्ध खेळ.' अशी धिक्कारयुक्त अर्जुनाची वाणी ऐकतांच वृषसेनास मोठा कोप आला, मुख आरक्त झालें, भोंवया वर चढल्या, तेणेंकरून त्याचा चेहरा असा भयंकर झाला कीं, आतां काय करील कोण जाणे ! पण त्यानें अर्जुनास दुष्ट वचनांनीं उत्तर न देतां, त्या त्या प्रसंगीं प्रयत्नानें संपादिलेल्या तीक्ष्ण बाणांनीं अर्जुनाची निर्भर्त्सना केली.

**दुर्यो०**:—शाबास, वृषसेना शाबास, अनुरूप कर्म त्वां केलें. बरें सुंदरका, पुढें काय झालें ?

**सुंदर०**:—मग महाराज, वृषसेनाच्या तीक्ष्ण बाणांनीं जेव्हां अर्जुन विद्ध झाला तेव्हां फार क्रोधास चढून त्यानें ज्याच्या दोरीच्या टणत्कारानें विद्युल्लतेचा शब्द लज्जित होणार अशा गांडीव धनुष्याच्या योगानें आसपास कोणास फिरकूं न देतां सर्व दिशा व्यापणारी अशी भयंकर बाणवृष्टि करून आपल्या विद्येस व बलास अनुरूप असें कांहीं आश्चर्यजनक कर्म केलें.

**दुर्यो०**:—( कांहीं कल्पना मनांत आणून ) मग पुढें काय झालें ?

**सुंदर०**:—मग महाराज, शत्रूचें अद्‌भुत युद्धचातुर्य पाहून कुमार वृषसेनानें त्याहून विशेष युद्धकौशल्य दाखविलें. असें कीं, भात्यांतून बाण काढतो केव्हां, धनुष्यावर ठेवतो केव्हां, गुणाशीं जोडतो केव्हां, ओढतो केव्हां आणि सोडतो केव्हां, हें कोणाच्याही समजुतींत येऊं दिलें नाहीं.

**दुर्यो०**:—मग पुढें ?

**सुंदर०**:—मग महाराज, कौरवसेनेंतील व पांडवसेनेंतील सर्व वीरांचा समुदाय आपआपला युद्धव्यापार सोडून व परस्परवैरभावाचा क्षणभर त्याग करून शाबास, वृषसेना ! शाबास, असें मोठ्यानें म्हणत त्याजकडे टकमक पहात उभा राहिला.

**दुर्यो०**:—( आश्चर्य करून ) मग पुढें काय झालें ?

**सुंदर०**:—मग महाराज, सर्व धनुर्धरांस लज्जा व आश्चर्य देणारा असा पुत्राचा पराक्रम पाहून स्वामी अंगराज ( कर्ण ) हर्ष, रोष, करुणा आणि शंका अशा चोहोंच्या कचाटींत सांपडला, तेव्हां

त्यानें भीमसेनावर शरवृष्टि आणि कुमार वृषसेनावर बाष्पाकुल दृष्टि केली !

परशुरामपंत गोडबोले.

---

## २१. चंद्र आणि तारे.

[ ही गोष्ट मूळ एका अमेरिकन ग्रंथकारानें रचली आहे. बायबलाच्या आरंभीं जो सृष्ट्युत्पत्तीचा प्रकार वर्णिला आहे त्याला अनुलक्षून हिचें संविधानक आहे, हिचें मराठी रूपांतर खालीं दिलें आहे. ]

सृष्ट्युत्पत्तीच्या चवथ्या दिवशीं संध्याकाळ होऊन सूर्य आपलें देदीप्यमान तेज मिरवीत सर्व आकाश एकटाच क्रमून अस्तास गेला असतां, व मनुष्यपक्ष्यादि प्राणिजात अद्याप निर्माण न झाल्यामुळें शून्य दिसणाऱ्या भूपृष्ठावर अंधकार जमत चालला असतां, एकएकटाच सुंदर तारा पहिल्यानें आकाशांत उगवला. हें त्यास नवेंच जन्म लाधल्यामुळें तो आनन्दाश्चर्यानें अत्यंत चकित होत्साता कांहीं वेळ राहिला. मग चोहोंकडे पाहतो तों आपणासारखा सुंदर पदार्थ साऱ्या आकाशभर किंवा पृथ्वीवर कोणताही त्याच्या नजरेस येईना. परंतु फार वेळ लोटला नाहीं तों आधीं एक, मग दुसरा, मग तिसरा, असे एकामागून एक दुसरे तारे येऊन त्यास मिळाले. असें होतां होतां एका तासांत सर्व आकाशभर अचल तारे व ग्रह चमकूं लागले, आणि एक मोठा धूमकेतु मधोमध उगवून त्याची प्रभा चोहोंकडे फांकली.

हीं तेजें कांहीं वेळपर्यंत आपली परस्परांची प्रभा पाहण्यांत गर्क होऊन राहिलीं होतीं. लहानापासून तों मोठ्यापर्यंत सर्वांस असें वाटत होतें कीं, सर्व विश्वांत प्रधानतेज काय तें मी, बाकीचा हा सारा परिवार ! सर्वांस आपणा एकाखेरीज इतरांच्या तेजाचें मान स्पष्ट दिसे, स्वतःच्याविषयीं मात्र यथार्थबुद्धि नव्हती. ( ठीकच ! इहलोकीं काय किंवा आकाशांत काय, स्वतःविषयींचें ज्ञान म्हटलें म्हणजे नेहमीं शेवटींच व्हावयाचें ! ) असो; ही प्रत्येकाची भ्रांति कांहीं वेळानें दूर झाली. ती अशी कीं, खालीं समुद्रांत सर्वांचीं प्रतिबिंबें यथास्थित व यथाकृति पडल्यामुळें आपल्या तेजाचें मान ज्यास त्यास वास्तविकपणें कळून आलें. याप्रमाणें त्या जलमय आरशानें प्रत्येकास त्याचें त्याचें खरें स्वरूप दाखवून सर्वांचा हळूहळू अहंपणा हरिला. नाहीं असा एका धूमकेतूचाच मात्र. त्याचा झोत पश्चिमेकडे भला लांबवर पसरला असल्यामुळें साऱ्या आकाशांत मजसारखें तेज माझेंच, असा गर्व अजूनही तो वाहात होता.

हीं सर्व तेजें आपआपणांविषयीं व परस्परांविषयीं याप्रमाणें विचार करीत आहेत तों एक लहानशी प्रकाशाची कोर सर्वांच्या दृष्टीस पडली. ही क्षितिजाचे वर अंमळ प्रकाशते न प्रकाशते तों लागलीच मावळली. ही कोर प्रतिपदेचा चंद्र होय. चंद्रास त्यांचा तो लखलखाट पाहून आपणांविषयीं मोठा संकोच वाटला; व त्यांचा पूर्ण आकार बघून आपल्या स्वतःच्या बारीकपणाची त्यास फार लाज वाटली. पण समुद्रानें लवकरच त्यास आपल्या पोटांत ठाव दिल्यामुळें त्यांच्या दृष्टीआड त्यास होतां येऊन तो स्वस्थ झाला. तो दिसेनासा झाल्यावर सर्व तारे एकमेकांकडे टकमकां बघूं लागले, व त्यांच्या साश्चर्य मुद्रेवरून ‘ कायहो विचित्र रूप ! ’

असें ते म्हणत आहेत काय, असें दिसलें. नंतर चंद्राच्या वांकडे-पणास व लाजाळूपणास सर्व हंसले, व त्याचा उपहास करूं लागले. हा त्यांचा विनोद असा पुष्कळ वेळ चालला असतां त्यांस एका-एकीं असें वाटूं लागलें कीं, आपली प्रभा मंद पडत चालली. पहा-टेची वेळ होऊन सर्व हळू हळू दिसेनासे होऊं लागले; व त्यांस असा धाक पडला कीं, आतां आपला अगदींच विलय होतो कीं काय कोण जाणे !

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं हीं मावळलेलीं तेजें पुनः हळूहळू उगवलीं; व डोळे उघडून पाहतात तों आदल्या रात्रींच्या मंडळी-पैकीं एकही गळालें नाहीं ! यामुळें सर्वांस फार आनंद वाटला. आदल्या रात्रींची कोरही पुनः उगवली होती, व त्यावेळेस पूर्वींच्यापेक्षां तिचें तेज अंमळ चढलेंसें दिसत होतें. पण मागल्या-प्रमाणेंच ती त्या रात्रींही लवकरच मावळली; व तिच्यामागें धूम-केतु आपलें विस्तीर्ण व अप्रतिम तेज सर्व आकाशांत मिरवीत राहिला.

तिसऱ्या रात्रीं चंद्राचा आकार व तेज हीं इतकीं वाढलीं, व तो पहिल्यापेक्षां आतां इतका वर उगवला होता कीं, सर्वांचे डोळे त्याच्याकडे लागले. तो या रात्रींही लवकरच अस्तास गेला; पण त्याच्या वृद्धीचें सर्वांस इतकें आश्चर्य वाटलें होतें कीं, त्या सगळ्या रात्रभर आकाशगंगेच्या दोन्ही बाजूंचे तारे त्याच्याविषयीं बोलत होते. शेवटीं ‘ प्यारेदैज ’ नामक बागेंतील नव्या उत्पन्न केलेल्या मनुष्यास त्याच्या प्रथम निद्रेंतून जागी करणारी पहाटच्या वाऱ्याची गार झुळूक सुटून तिनें ताऱ्यांस अंतर्धान पावण्याची

सूचना केली. नंतर सूर्योदय होऊन जगाच्या पहिल्या विश्रामोत्सा-हाची सुरवात झाली. या दिवशीं सूर्याची उदयशोभा अशी कांहीं अपूर्व होती कीं, तसा थाट अलीकडील अष्टाकाराच्या दिवसांत कधींही दृष्टीस पडत नाहीं. या रात्रींही चंद्र आणखी वर चढून पूर्वीपेक्षां त्याचें तेज वाढलें होतें; तें इतकें कीं, त्याच्या शेजारचे कांहीं तारे मंदप्रभ होऊन कांहीं तर मुळींच दिसतनासे झाले. बाकीच्या ताऱ्यांस या गोष्टीचें कारण नीट समजेना, यास्तव त्यांचा असा तर्क वाहिला कीं, जवळच्या ताऱ्यांचें तेज हिरावून घेऊन हा आपला प्रकाश वाढवीत आहे. मग काय विचारावें ! सर्वांस अशी धास्ती पडून गेली कीं, हा गिळंकृत करण्याचा क्रम असाच पुढें चालवून हळूहळू सर्वांचा स्वाहा करण्यास चुकणार नाहीं.

याप्रमाणें दररात्रीं चंद्राचा आकार व सौंदर्य हीं वाढत वाढत चाललीं असतां त्यानें आपली मूळची सौम्य वृत्ति अगदीं सोडली नव्हती. असें होतां होतां त्याचें बिंब अर्धाहून अधिक वाढलें. तेव्हांपासून मात्र त्याच्या वृत्तींत फेर पडून त्यास आपल्या थोर-वीचा अभिमान वाटूं लागला. त्याचे किरण अधिकाधिक दुःप्रेक्ष्य होऊन त्याच्याजवळ तारे टिकतनासे झाले. फार काय, पण धूम-केतूचेंही तेज त्यापुढें मालवलें. पौर्णिमेच्या रात्रीं तर त्याचें वैभव काय सांगावें ! आकाशाच्या मध्यभागीं झळकूं लागून त्यानें सर्व जगास शीतळ असा प्रतिदिवसच भासविला ! समुद्रांत त्याचें प्रतिबिंब पडलें होतें, त्याची अप्रतिम शोभा पहातच राहून त्यास आपली मोठी धन्यता वाटली; आणि जे थोडे तारे अजूनही आकाशांत चमकत

होते ते त्याच्या अफाट तेजास भिऊन आकाशांत खोल खोल जागीं जाऊन दडाले.

चंद्रासही आपला आकार व तेज अशींच आणखी कोठवर वाढत जाणार याचा कांहीं निश्चय होईना. त्यास असें वाटलें कीं, माझा आकार पूर्ण भरला खरा; पण याहूनही मला आणखी मोठें व्हावयाचें कशावरून नसेल! माझी मला अजूनही सतत वृद्धि होऊन, एडन बागेंतील नव्या जोडप्यानें वर बघितलें असतां त्यास आकाश चंद्रमयच दिसावें असें कशावरून होणार नाहीं! पण याप्रमाणें आनंदाच्या भ्रमांत तो गर्क झाला असतां एकाएकीं अंधकाराची एक बारीक छटा त्याजवर चढूं लागली. ती चढतां चढतां तिनें कांहीं वेळानें सर्व बिंब व्यापिलें; व चंद्राची पूर्वीची शोभा अगदीं नाहींशी होऊन तो आतां आकाशरूप फलकावर वाटोळ्या डागासारखा दिसूं लागला. हा कहर त्यावर गुदरत असतां त्याच्या प्रभेंत लोपून गेलेले तारे त्याचा तेजोभंग पाहण्याकरितां पुनः हळूच पुढें सरसावले; पण हा त्यांचा हर्ष व चंद्राची विटंबना हीं फार वेळ टिकलीं नाहींत. ती छाया जशी हळूहळू त्याच्यावर आली होती तशीच ती हळूहळू चालतीही झाली, व ती गेल्यानंतर चंद्राची कांति पूर्वीपेक्षां फारच खुलूं लागली!

आणखी एक दिवस जाऊन दुसरी रात्र आली व चंद्र नेहमीं-प्रमाणें आदल्या रात्रीपेक्षां जरा उशीरानें उगवला. या रात्रीं जमि-नीवरून आकाशक्रमण करीत असतांही चंद्रास आपलें तेज अंमळ कमी झालेंसें भासतच होतें. मग समुद्रांत प्रतिबिंब दृष्टीस पडल्यावर तर त्याची खात्रीच झाली. त्या रात्रीं वादळाचा रंग दिसूं लागला. वारा

एकाएकीं सोसाट्याचा वाहूं लागून लाटा उसळल्या, व समुद्र फेंसाळून गेला. तसेंच त्यास भरती येऊन चंद्राविषयींचा स्नेह त्यानें त्याच वेळेस प्रथम प्रकट केला. असें होतां होतां मोठें तुफान झालें. आकाश विजेच्या गडगडाटांनीं दणाणून जाऊन पृथ्वी पावसाच्या धोंधाट्यांनीं जलमय होऊन गेली. या संधींत ढगांच्या ऐन गर्दींत चंद्र लपून गेला; व त्याशीं स्पर्धा करून त्याच्या विपत्तींत हृष्ट होणारे जे तारे त्यांसही कोठें तोंड बाहेर काढण्यास जागा राहिली नाहीं !

दुसऱ्या दिवशीं रात्रीं व त्यापुढील कित्येक रात्रीं चंद्र उशीराउशीरानें उगवून त्याचें तेजही कमी कमी होत गेलें. तसेंच दररात्रीं त्यापुढें पूर्वीं दिपून गेलेले तारेही त्याचें मंद पडत चाललेलें तेज व विरूप झालेला आकार पाहण्यास अधिक अधिक उगवूं लागले. पूर्वींच्या उत्कर्षानें तो चढून गेला होता, पण सध्यांच्या अपकर्षाच्या योगानें त्याची मूळची सौम्य वृत्ति पुनः प्रगट झाली, आणि त्याच्या गर्वामुळें त्यावरचा सर्वांचा स्नेह उडाला होता तो त्याच्या नम्रत्वानें त्यास पुनः प्राप्त झाला. तो शेवटला वर्तुलपादक्रमण करीत असतां दररात्रीं त्याच्या बिंबाचा ऱ्हास होत जाऊन जेव्हां त्याची कोर पडत चालली तेव्हा त्याची जी रमणीयता दिसली तशी पूर्वीं कधींच दिसली नव्हती.

असें होतां होतां शेवटीं अशी एक रात्र आली कीं, तींत चंद्र मुळींच उगवला नाहीं. धूमकेतूही आधींच कोणीकडे नाहींसा झाला होता. त्या रात्रीं साऱ्या आकाशांत चोहोंकडे सामसूम होतें. एका महिन्यांत जे इतके विलक्षण फेरफार झाले त्याविषयीं गंभीर-

तेनें विचार करीत त्यांनीं सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत आकाश आक्रमण केलें आणि नुसत्या आलेल्या अनुभवानें शाहाणे होऊन जो तो आपल्या लहानथोर पदवींत सुखसमाधान मानून राहिला. पुढील रात्रीं सर्वजण पाहतात तों चंद्राची कोर पुनः पश्चिमेस दृष्टीस पडली. तेव्हां सर्वांस अतिशय विस्मय व आनंद वाटून त्याच्या पुनरुज्जीवनाचें सर्वांनीं एकदम अभिनन्दन केलें. मग तो अस्तास जाऊं लागून त्याची कोर काळ्याजांभळ्या अशा क्षितिजावर टेंकलीशी दिसत होती तोंच, असें सांगतात कीं, त्याच्या दोन्ही टोंकांच्या मधोमध उभा राहिलेला एक देवदूत सर्वांच्या दृष्टीस पडला. त्यानें चोहोंकडे आपली नजर फेंकली, तों सूर्य त्याच्या पाठीमागें खूप खोल पाताळीं गेला होता, चंद्र त्याच्या पायाखालींच होता, पृथ्वी त्यास समोर दिसत होती, आणि आकाश नक्षत्रांच्या योगानें लकाकत होतें. ती अपूर्व शोभा पाहून तो क्षणभर आश्चर्यानें तटस्थ झाला आणि नंतर, "हे जगदीशा ! तुझी सृष्टि अतर्क्य व अद्भुत आहे ! तींत तूं आपलें अपार चातुर्य प्रकट केलें आहेस." असा आनंदोद्गार काढून तो उगाच राहिला; व तेव्हांपासून आकाशांत सर्वांचा एक मिलाफ होऊन राहिला आहे !

विष्णुशास्त्री चिपळूणकर.

---

## २२. हिमालयवर्णन.

**अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा । हिमालयो नाम नगाधिराजः ॥**
**पूर्वापरौ तोयनिधी वगाह्य । स्थितः पृथिव्या इव मानदण्डः ॥**

—कालिदास.

भव्य अशा सृष्ट किंवा कृत्रिम वस्तूंचें अवलोकन करून जिज्ञासा तृप्त करण्याची हौस सर्वांस असते. पण अतिपरिचयामुळें संनिध असलेल्या प्रेक्षणीय व वर्णनीय वस्तूंची आपल्या हातून अनेक वेळ अवज्ञा होते आणि त्या अवज्ञेमुळें, त्या वस्तूंच्या दर्शनापासून होणाऱ्या ज्ञानास व आनंदास आपण अंतरतों. हिमालय, सिंधु, गंगा, विंध्य, ब्रह्मपुत्र, सह्याद्रि वगैरे प्रचंड गिरिनद्या अत्यंत प्रेक्षणीय व वर्णनीय असून, आमचें लक्ष त्यांकडे जात नाहीं, हा चमत्कार नव्हे काय ?

हिंदुस्तानच्या नकाशाकडे पाहिलें असतां, सर्वांआधीं डोळ्यांत भरणारी हिमालयपर्वताची आकृति होय. या पर्वतामुळें आमचें जें हित होत आहे, त्याची खरी कल्पना फारच थोड्यांस असेल. हा आमच्या उत्तरसीमेवर नसता तर सिंधु, गंगा, ब्रह्मपुत्रा वगैरे आमच्या मोठमोठ्या नद्या आमच्या कधींच दृष्टीस न पडत्या, व कदाचित् बंगाल प्रांतही अस्तित्वांत न येता. ज्याप्रमाणें अरबी समुद्र आणि बंगालचा उपसागर यांच्या सान्निध्यामुळें भरतखंडाच्या दक्षिण त्रिकोणार्धाचें नैसर्गिक परिघानें संरक्षण होत आहे, त्याप्रमाणें या त्रिकोणाच्या पायाचें म्हणजे उत्तरेचें आणि या पायाच्या वायव्य व ईशान्य कोनांचें संरक्षण या हिमालयरूप प्रचंड सृष्ट तटानें होत आहे ! हिंदुस्तानच्या उत्तरप्रदेशाची लांबी कमींत कमी १५०० मैल आहे, व तितक्या लांबीचा दुर्गम तट आमच्या सुदैवानें आम्हांस प्राप्त झाला आहे. असा तट चीन देशाच्या उत्तरेस नसल्यामुळें तेथील लोकांस पुरातन कालीं किती त्रास झाला असावा, हें त्यांनीं तेथें बांधलेल्या विलक्षण भिंतीवरूनच व्यक्त होतें ! आमचा

हिमालय आम्हांस नसता, तर चिनीलोकांप्रमाणें आम्हांसही लाखों गुलाम शेंपन्नास वर्षें आमच्या उत्तरसीमेचा बंदोबस्त करण्याकरितां राबवावे लागले असते! पण तितका त्रास, निर्दयपणा व खर्च करूनही जितकी निर्भयता आतां आहे तितकी आह्मांस कधींही प्राप्त झाली नसती. इतकेंच नाहीं, तर हवा, सुपीकता इत्यादिकांच्या संबंधानें हिमालयाकडून आम्हांवर हजारों वर्षें जे उपकार होत आहेत, तसले त्या मनुष्यकृत भिंताडाकडून कधींच न होते! हिमालय हें एका पर्वताचें नांव आहे व तो हिंदुस्तानच्या उत्तरेस आहे, एवढेंच ज्यास ठाऊक आहे, त्यास सह्यविंध्यादि इतर पर्वतांच्या घटनेवरून असें वाटणार आहे कीं, पृथ्वीच्या त्या विशाल 'मानदंडा'ची रचनाही सामान्य पर्वतांसारखीच असावी. पण वास्तविक तशी स्थिति नाहीं. ज्याप्रमाणें हिमालयाचा विस्तार, त्याची उंची, त्यावरील प्राणी, वनस्पति व जमिनी, हीं सारीं इतर पर्वतस्थ वस्तूंपेक्षां भिन्न आहेत, त्याप्रमाणें त्याची रचनाही इतरांच्या रचनेहून फार निराळी आहे. हिमालय हा एक पर्वत नाहीं, तो दोन पर्वतांच्या रांगांनीं झालेला गिरिद्रोण आहे! विमानांत बसून फार उंच गेल्यावर, त्याकडे खालीं वांकून पाहिल्यास तो केळीच्या पानाच्या अफाट दुटाकी द्रोणाप्रमाणें दिसेल! या द्रोणाची एक बाजू हिंदुस्तानाकडे आहे व दुसरी तिबेटाकडे आहे. हिंदुस्तानाकडील बाजू दुसऱ्या बाजूपेक्षां अधिक उंच आहे. हिंदुस्तानाकडूनच या पर्वताची कल्पना मनांत आणिली तर ज्याची धार हिंदुस्तानाच्या दक्षिणेकडे टेंकविली आहे असा एक हा अतिविशाल अमरखड्ग किंवा खंजीर आहे, असें वाटेल! या बाजूस साहेब

लोक हिमालयाची दक्षिण भिंत व दुसऱ्या बाजूस उत्तर भिंत म्हणतात. दक्षिण भिंतींत किंवा बाजूस जीं शिखरें आहेत त्यांची उंची पृथ्वीतील कोणत्याही शैलशिखराच्या उंचीहून अधिक आहे. हीं शिखरें या बाजूच्या मध्याच्या सुमारास आहेत. सर्वांत उंच शिखरास आमचे लोक गौरीशंकर व इंग्रज लोक मौंट एव्हरेस्ट असें म्हणतात. गौरीशंकराची उंची समुद्रपृष्ठभागापासून २९,००० फुटांहून अधिक आहे. याच्या खालोखाल कांचनगंगा नांवाचें जें दुसरें शिखर आहे, त्याची उंची देखील २८,००० फुटांपेक्षां अधिक आहे. तेव्हां यांपैकीं कोणत्यावरही जाण्याचा प्रयत्न करणें म्हणजे वातावरणांत ओळंब्याच्या दोरीस धरून पांच सहा मैलांचा प्रवास करण्यासारखें होय ! वातावरणांत जों जों वर जावें तों तों अधिकाधिक थंडी लागते, हें सर्वांना ठाऊक आहेच, व थंडीनें पाणी गोठतें हेंही कोणास ठाऊक नाहीं असें नाहीं. तेव्हां हीं शिखरें नेहमीं हिमाच्छादित म्हणजे बर्फावृत कां असतात, हें सहज लक्षांत येणार आहे. आतां कोणी अशी शंका घेतील कीं, इतक्या उंचीवर एवढा विस्तार बर्फानें झांकण्यासारखें पाणी तरी कोठून येतें? थोडासा विचार केला असतां या शंकेचें समाधान ज्याचें त्यास सहज करतां येणार आहे. बंगालचा उपसागर बंगाल्यास लागून आहे; व या उपसागराच्या विस्तीर्ण विस्तारावर भगवान् सूर्यनारायण आपल्या सहस्र रश्मींनीं नित्य प्रकाशून त्याच्या पाण्याची वाफ करतो. ही वाफ वायुरूपानें बंगालच्या उपसागरापासून हिमालयापर्यंत वातावरणांतील उच्च प्रदेशांत भटकत असते. वैशाखमास उलटून गेला आणि दक्षिणध्रुवाकडून सोंसाट्याचा थंड वारा वाहूं लागला,

म्हणजे या आकाशस्थ बाष्पराशींचे सजल जलद होतात, आणि ते त्याच वेगानें बंगाल प्रांतावर पर्जन्यवृष्टी करीत करीत, हिमालयाच्या दक्षिण भिंतीवर धडाधड आदळूं लागतात. त्यांतल्यात्यांत जे बरेच वर असतात ते पलीकडे निसटून निघतात, आणि दक्षिण भिंतीच्या तिबेटाकडील बाजूवर थोडासा वर्षाव करून पुढें पळ काढितात ! द्रोण्युदराचें उल्लंघन होईतोंपर्यंत त्यांस आपण आपला रस्ता अडविणाऱ्याच्या कचाट्यांतून सुटलों, असें वाटत असतें ! पण त्यांचा हा भ्रम लौकरच नाहींसा होतो ! द्रोणीच्या दुसऱ्या बाजूस जाऊन पोहोंचल्याबरोबर दक्षिण भिंतीसारखीच तिकडेही प्रचंड आडवी भिंत लागते व तिचा भेद करून निघून जाण्यासाठीं ते तीवर मत्त मतंगजांप्रमाणें टकरा देऊं लागतात ! पण तिच्या अभेद्य स्थाणुत्वापुढें त्याचें कांहींएक न चालून ते रडकुंडीस येतात. आणि त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालू लागून, त्यांच्या वर्षावानें त्या बाजूवर वाहूं लागणाऱ्या अश्रुजलाचे लोट द्रोणींत पडूं लागतात ! पुढें निसटून जाणाऱ्या ढगांची ही दशा झाली. पण ज्यांच्या आड मोठमोठीं शिखरें येतात त्यांची त्यांच्या इतर बंधूंहूनही विशेष कष्टमय स्थिति होते ! या शिखरांवर जी कडक थंडी असते तीमुळें या शिखरांच्या आसमंतात् येणाऱ्या ढगांची जलावस्था नाहींशी होऊन त्यांस पाषाणघनता येते. आणि शिखराभोंवतीं ते बर्फाचा थर करून राहतात ! पुढें सुदैवानें उष्णमासांत सूर्यास त्यांची कींव आली तर तो त्यांस तेथून सोडविण्याचा प्रयत्न करतो, आणि या त्याच्या प्रयत्नास थोडेंबहुत यश आल्यास ते या किंवा त्या बाजूस घसरत जाऊन इकडील

नदीप्रवाहांत, अथवा तिकडील द्रोण्युदरांत जाऊन पडतात, व येथें नद्युदकाशीं एकरूप होऊन आपला जनक जो नदीपति त्यापाशीं रूपांतरानें येऊन दाखल होतात.

हिमालयाच्या उत्तर भिंतीस लागून असलेले काराकोरम वगैरे तिबेटाचे दक्षिण डोंगर आणि सैबेरियाच्या व त्याच्या दरम्यान असलेले क्युएनल्यूएन नांवाचे डोंगर, चीनचे पर्वत, व हिंदुकुश वगैरे पर्वत आणि खुद्द हिमालय—या सर्वांचा मध्यबिंदु काश्मीरच्या वायव्येस पामीर नांवाचा जो अत्युच्च घांटमाथा आहे, तो आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. या मध्यबिंदूपासून या पर्वतांच्या रांगा विषम त्रिज्यांप्रमाणें आशियाखंडरूप वर्तुळाच्या परिघापर्यंत जाऊन भिडतात. बंगालच्या उपसागरांत व बंगाल प्रांतांत जेवढ्या पाण्याची वाफ होते तेवढी सारी वर गेल्यावर, पर्जन्यरूपानें बंगालच्या मैदानांत किंवा हिमालयाच्या दक्षिणोत्तर भिंतींच्या तीन बाजूंवर फिरून उतरते, किंवा तींपैकीं कांहींचें बर्फ होऊन तेंही उन्हाळ्यांत पुनः हिंदुस्तानाकडे वहात येणाऱ्या नद्यांतच पडतें. यामुळें हिमालयावर जितका पाऊस पडतो, तितका पृथ्वीवर दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं पडत नाहीं. अलीकडे या पावसाच्या संबंधानें जी बिनचूक मापें घेतलीं आहेत, त्यावरून या पर्वतावर प्रतिवर्षी सरासरीनें ५२३ इंच पाऊस पडत असावा, असें दिसून आलें आहे, व १८६१ त कांहीं विशेष कारणामुळें ८०५ इंच पाऊस पडल्याचा सरकारी दप्तरांत दाखला आहे! लंदन येथें सरासरी दोन फूट पाऊस पडतो व हिंदुस्तानांत स्थलां-

तराप्रमाणें १ फुटापासून ६ फुटांपर्यंत पडतो. हिमालयांतील चेरा-पुंजासारख्या ठिकाणीं ३० पासून ४० फुटांपर्यंत धारासंपात होतो, आणि एके वर्षी तर ६७ फूट झाला, हें सिद्ध आहे. एवढा वर्षाव, ज्यांत शहर वसलें आहे अशा एकाद्या सपाट प्रदेशांत होईल, तर त्यानें जमलेल्या पाण्याखालीं तीन किंवा चार मजली वाड्यांचा देखील मागमूस नाहींसा होईल हें उघड आहे !

गोपाळ गणेश आगरकर.

---

## २३. कै० न्या० महादेव गोविंद रानडे.

**देशसेवा:**—माधवरावजी पुण्यांत असतांना त्यांनीं महाराष्ट्राचे राजधानीतील लोकांस जें वळण लावून दिलें व त्यांच्या ठिकाणीं स्वदेशाबद्दल जी जागृति उत्पन्न केली तीच आमच्या मतें त्यांची देशासंबंधी मोठी कामगिरी होय. माधवरावजींच्या पूर्वी पुण्यास कै. केरूनाना, कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर, कै. देशमुख वगैरे बरेच बुद्धिमान् व उद्योगी पुरुष होऊन गेले होते. कै. गोपाळराव यांची शांति आणि उद्योग हे गुण आणि कै. चिपळूणकर यांचें बुद्धिमत्त्व अलौकिक होतें; पण राष्ट्राच्या अभिवृद्धीस किंवा उत्कर्षास हे गुण जितके कामीं यावे तितके आले नाहींत. हें काम माधवरावजींनींच केलें व तें त्यांनीं इतक्या उत्तम रीतीनें बजाविलें कीं, त्यांच्या पश्चात् इतकें काम करणारा पुरुष पुनः मिळणें कठीण आहे. सार्वजनिक सभा, वक्तृत्वोत्तेजक सभा, लायब्ररी, लवादकोर्ट, देशी कापडाचें दुकान, वसंत-व्याख्यानमाला, अजबखाना, गायन-समाज, औद्योगिक परिषद, कलाकौशल्याचें प्रदर्शन, फीमेल एज्युकेशन सोसायटी,

प्रार्थनासमाज, ज्ञानप्रकाश, सार्वजनिक सभेचें त्रैमासिक इत्यादि निरनिराळ्या राजकीय, सामाजिक, औद्योगिक किंवा शिक्षणसंबंधीं चळवळींत त्यांचा प्रत्यक्ष किंवा परोक्ष संबंध होता. किंबहुना या सर्व चळवळी करण्यास महाराष्ट्रांतील लोकांस शिकविण्यास हे गुरुच झाले होते, असें म्हटलें तरी चालेल. मुंबईस यापूर्वी दादाभाई नवरोजीसारख्यांनीं राजकीय चळवळीचें बीं पेरलेलें होतें, पण घाटावर त्याची लागवड माधवरावजींनींच पहिल्यानें केली. कोणी मनुष्य केव्हांही माधवरावजींकडे कोणत्याही विषयासंबंधानें माहिती विचारावयास जावो, त्यावेळीं त्यांनीं त्यास ' नाहीं ' असें कधींच म्हटलें नाहीं. कायदा, धर्मशास्त्र, उद्योगधंदे, फडनिशी जमाखर्चाचे आंकडे, अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें, व त्यांत हिंदुस्तानची विशेष स्थिति लक्षांत आणून करण्याजोगे फेरफार, ऐतिहासिक माहिती, स्वभाषेचे ग्रंथ इत्यादि अनेक विषयांत यांची बुद्धि सारखीच चालत होती, व तिचा देशकार्याकरितां उपयोग करण्याकरितां ते सदैव तत्पर असत. सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांत त्यांनीं वेळोवेळीं जे लेख लिहिले आहेत ते व त्या सभेचे जे अर्ज तयार केले आहेत ते अद्यापही मनन करण्यासारखे असून आंकडे व इतर माहिती यांनीं अगदीं परिपूर्ण भरलेले आहेत.

ज्ञानसंपादन करण्याची माधवरावजींची हौस इतकी कांहीं अनिवार असे कीं, कोणीही यःकश्चित् मनुष्य त्यांजकडे गेला तरी त्यास जो विषय अवगत असेल त्यांतच त्याच्याशीं बोलून ते त्याजपासून कांहीं तरी माहिती काढून घेत. लेखन, वाचन व वक्तृत्व हीं तर त्यांचीं व्यसनेंच बनून गेलीं होतीं; व मरणापूर्वी

कांहीं दिवस जेव्हां त्यांचें वाचन बंद करण्याचा प्रसंग आला तेव्हां यापेक्षां मरण बरें असें त्यांस होऊन गेलें असें म्हणतात! ‘ बालादपि सुभाषितं ग्राह्यम् ’ या न्यायानें ते ज्ञानाचा संग्रह करीत असत, व त्यांचा मेंदू इतका विशाल होता कीं, या सर्व विषयांस त्यांच्या डोक्यांत केव्हांही योग्य स्थळ मिळत असे. ग्रंथकार या नात्यानें माधवरावजींनीं कांहीं स्वतंत्र ग्रन्थ पुरे करून प्रसिद्ध केलेले नाहींत. निरनिराळ्या सामाजिक, राजकीय व धार्मिक विषयांवर वेळोवेळीं त्यांनीं जीं व्याख्यानें दिलीं व निबन्ध आणि अर्ज लिहिले ते त्यांचे महत्त्वाचे लेख होते. त्यांनीं देशकार्याचें जें काम पतकरिलें होतें तें संभाळून मोठमोठे स्वतंत्र ग्रंथ लिहिणें शक्य नव्हतें, हें मि. ग्लॅडस्टन यांच्या उदाहरणावरून सहज समजून येण्यासारखें आहे. रोज प्रचलित असलेल्या हजारों विषयांचा यथास्थित ऊहापोह करून व त्यांचा देशसुधारणेशीं कसा काय संबंध पोहोंचतो हें लक्षांत आणून त्यांची माहिती नेहमीं लोकांस द्यावयाची, तद्द्वारा लोकांची जागृति कायम ठेवावयाची, हें काम इतक्या श्रमाचें आहे कीं, मोठ्या बुद्धिमान् पुरुषांसही इतके व्यवसाय उरकून ग्रंथलेखनास फुरसत मिळणें शक्य नाहीं. शिवाय सरकारी नौकरीचीं कामें माधवराव यांजकडे असत तीं निराळींच. तथापि, इतकीं सर्व कामें उरकूनही कै० नीलकंठ जनार्दन कीर्तने यांनीं गोळा केलेल्या टिपणांवरून त्यांनीं मराठ्यांच्या इतिहासाचा निम्मा अधिक भाग मरणापूर्वीं लिहून काढलेला आहे. माधवरावजींच्या लेखाचा विषय कोणताही असो, त्यांत त्यांनीं कांहीं तरी नवी कोटी किंवा कांहीं नवी कल्पना काढली नाहीं, असें कधींच होत नसे. कोणतीही

बाजू समजून लिहिण्याचा त्यांचा हातखंडा होता. एकंदर हिंदुस्थानांत काय चळवळी चालल्या आहेत व त्या कोणत्या धोरणावर नेल्या पाहिजेत, याबद्दल त्यांचे विचार नेहमीं एकसारखे चालू असत. सामाजिक सुधारणेचे तर हे अध्वर्यूच होते. याच्यासारख्या विद्वान् गृहस्थानें हातीं धरल्यामुळें यांपैकीं कांहीं संस्थांस विशेष महत्त्व आलें होतें.

खाजगी वर्तन व स्वभावः—रावसाहेबांचें खाजगी वर्तन आणि स्वभाव हीं ब्रह्मकुलांत जन्मलेल्या विद्वानास साजण्यासारखीं होतीं. संपत्तीची उणीव नसतांही त्यांनीं कधीं ऐषआरामाची इच्छा धरिली नाहीं. साधा पोषाख, साधें वर्तन आणि साधा ब्राह्मणी आहार यांतच त्यांस संतोष वाटत असे. रावसाहेबांकडे कोणी गेला आणि तो कितीही गरीब आणि हलक्या प्रतीचा असला तरी त्याचा अव्हेर कधींही होत नसे. दुर्व्यसन, अपशब्द किंवा राग यांपासून ते अगदीं अलिप्त असत. यांची घरची राहणी अगदीं साधी असून, हिंदुकुटुंबांत कोणीही मिळविता झाला तरी त्यास आपल्या वडील माणसांशीं मिळून मिसळून वागणें जरूर आहे, हें तत्त्व स्वाभाविक रीत्याच यांच्या अंगीं खिळलेलें होतें. जें कांहीं कारणें असेल तें परंपरागत क्रम विशेष न बिघडतां केलें तरच शहाणपणा आहे असें यांचें मत होतें. सामाजिक व राजकीय जागृति नेहमीं कायम राखून परिस्थिति सुधारण्याचा उद्योग व चळवळ सदैव चालली तरच त्यांत देशाचें कल्याण आहे, नाहींपेक्षां उत्तरोत्तर समाज थंडावत जाऊन लयास जाईल, असें त्यांच्या मनानें घेतलें होतें. त्यांच्या सर्व देशसेवेचें बीज हेंच होय. अशा तऱ्हेचा साधा, निर्व्यसनी,

विद्वान्, कल्पक आणि सतत देशकार्याकरितां कायावाचामनें-करून स्वतः झटणारा आणि लोकांस झटण्यास शिकविणारा थोर पुरुष आपल्यामधून आपल्या वयास ६० वर्षें होण्यापूर्वींच नाहींसा व्हावा हें मोठें दुर्दैव होय !

बाळ गंगाधर टिळक.

---

## २४. महादजींचे गुणावगुण.

महादजींच्या गुणांपैकीं अत्युत्कृष्ट गुण म्हटला म्हणजे त्यांचें शौर्य हा होय. आतां ज्या काळांत महादजींचा जन्म झाला, आणि ज्या कुलांत त्यांचें जनन झालें, तो काळ व तें कुल यांच्या संबंधानें थोडासा विचार केला असतां कोणाच्याही लक्षांत सहज येणार आहे कीं, सोळाव्या शतकाच्या अखेरीपासून एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंतचीं दोन शतकें महाराष्ट्राच्या व मराठ्यांच्या इतिहासांत केवळ अपूर्व होतीं; व क्षत्रियकुलांत उत्पन्न झाले असतांही ज्यांच्याकडे अपूर्व दैवयोगानें नांगर धरण्याचें अगर चावडीवर बसून गांवपाटिलकी करण्याचें अशीं कामें सोळाव्या शतकाच्या अखेरपर्यंत होतीं, त्यांना एकदम आपल्या पूर्वजांचें स्मरण होऊन त्यांनीं बारगिरीचा धंदा स्वीकारून समशेरीचा आश्रय केला, इतकेंच नव्हे, तर ज्यांच्या आदिपुरुषांचे दिवस यज्ञ, याग, तपश्चर्या इत्यादि सौम्य कर्मे करण्यांत गेले त्या ब्राह्मणांनीं सुद्धां दर्भ आणि पवित्रकें इत्यादिकांचा त्याग करून तरवार धारण केली, आणि या उभयांनीं मिळून मराठी राज्याची प्राणप्रतिष्ठा केली, हें सर्व अपूर्व नव्हे तर काय ? या काळांत वीरश्रीदेवीचा महाराष्ट्रांत

संचार झाला असून जिकडे तिकडे ब्राह्मण वीर, ब्राह्मण मुत्सद्दी, मराठे वीर आणि मराठे मुत्सद्दी यांची गर्दी दिसत होती. हें तर काय, पण ज्यांचा अधिकार चुलीपाशीं किंवा गोषांत मात्र, त्या ब्राह्मण अगर मराठी अबलांमध्यें सुद्धां स्वदेशाभिमान आणि स्वकुलाभिमान या दोन बहुमोल गुणांचा प्रवेश होऊन कैक प्रसंगीं या स्त्रियांनीं आपआपल्या यजमानांस महत्त्वाच्या प्रसंगीं मदत केलेली आढळते. पानिपतच्या लढाईच्या आगोटीस गौतमाबाईनें केलेला मल्हाररावास उपदेश, नवरा रणांगणांत घायाळ होऊन पडला म्हणून निराधारपणामुळें व्याकुळ झालेल्या फौजेचा दत्ताजीच्या बायकोनें केलेला उत्साहजनक उपहास, धोंडोपंत गोखले यांच्या बायकोनें पतिनिधनसमयीं दाखविलेलें त्वेषोत्पादी निःसीम धैर्य, आप्पासाहेब सांगलीकरांच्या बायकोनें ब्रह्मावर्ताकडे बाजीरावाची बिदागी करून घरीं येणाऱ्या नवऱ्याचा केलेला अमंगलसूचक अपमान, इत्यादि ठळक ठळक स्त्रियांचें वर्तन पाहून प्रत्यक्ष वीररसच येथें अवतीर्ण झाला होता कीं काय असें मनास वाटूं लागतें! असो; तर असल्या अबलाजनांसही उत्साह देणाऱ्या कालामध्यें महादजींचा जन्म झाला. शिवाय त्यांनीं आपल्या वडिलांची व भावांची शिपाईगिरी पाहिली होती. तेव्हां महादजी मोठे धारकरी शिपाई झाले यांत कांहीं फारसें नवल नाहीं. पण जें त्यांच्या वडिलांस फारसें साधलें नाहीं, आणि जें त्यांच्या बंधूंस मुळींच अवगत नव्हतें असें म्हटलें तरी चालेल, तें सेनापतीचें अगर सरदारगिरीचें काम महादजींस उत्कृष्ट येत असे. नानासाहेब पेशव्यांनीं जयाप्पास व दत्ताजींस वेळोवेळीं उपदेश केला होता, तो

त्यांस अवगत होता. शिवाय पानिपतच्या संग्रामीं ते स्वतः हजर होते. युरोपियन लोक कसे लढतात हें त्यांनीं पाहिलें होतें. त्या सर्वांवरून आणि ते स्वतः कुशाग्रबुद्धीचे असल्यामुळें, सेनापतीचें मुख्य कर्तव्य काय, त्यानें शत्रूंचे डावपेंच कसे हाणून पाडिले पाहिजेत, गम खाण्याची वेळ कोणती, चढाई केव्हां करून जावें, इत्यादि सरदारगिरीच्या कामांचें पूर्ण रहस्य पाटिलबावांस अवगत झालें होतें. पण हें सर्व पौरस्त्य चमूपतीचें ज्ञान झालें. या ज्ञानास राव शिंदे यांनीं पाश्चात्य युद्धकौशल्याची भर घालून केवळ यंत्राप्रमाणें फौजा हालविणारी नवी पद्धति त्यांनीं आपल्या इकडे सुरू केली. या नवीन पद्धतीनें लढतांना त्यांचा एक दोन वेळ पराजय झाला म्हणून ते यत्किंचितही डगमगले नाहींत, किंवा त्यांनीं अंगीकृत कार्याचा अगर मनुष्यांचा कधींही त्याग केला नाहीं. सारांश, नव्या व जुन्या युद्धपद्धतीचा जसा असावा तसा सेनानी आम्हांस पाटिलबावांमध्यें सांपडला होता, आणि ही नवी पद्धति पूर्ण करून सर्व चतुरंग सेना प्रगल्भ होईपर्यंत जर देवानें पाटिलबावांस आयुष्य दिलें असतें तर आमच्या हिंदुस्तानी फौजा सर्वांसच दुर्जय झाल्या असत्या. याप्रमाणें महादजी तरवारबहाद्दर आणि कुशल सेनापति होते.

पाटिलबावांमध्यें आणखी एक गुण होता. तो कोणता म्हणाल तर त्यांचें वक्तृत्वकौशल्य हा होय. त्यांच्या समशेरीच्या तडाक्यांत जो आला नाहीं, तो त्यांच्या मधुर, प्रेमळ आणि विनोदी भाषणाला लुब्ध झाला नाहीं असें कधींच झालें नाहीं. अंडरसन, पामर इत्यादि साधारण माणसांची तर गोष्ट राहूंद्याच. पण एवढा मोठा

राजकारणकुशल हेस्तिंग्स, तो सुद्धां त्यांच्या रसवंती वाणीला भुलून जाऊन, यांचा, केवळ ‘ होय बा ’ करणारा मित्र होऊन राहिला होता ! सवाई माधवराव यांचें प्रेम तरी महादजींनीं आपल्या मनोहर वाणीनें आणि लौकिकी सौजन्यानेंच ओढलें होतें. या सौजन्याचा कधीं कधीं अतिरेक झाल्यामुळें ते सभ्य मनुष्याच्या तिरस्कारास पात्र होत हें खरें; तथापि त्यांनीं आपल्या बाह्यतः साध्या वर्तनानें दिल्लीस व पुण्यास पुष्कळ छाप बसविली होती.

आतां शेवटचा त्यांचा सांगण्यासारखा गुण त्यांची धर्मावरील श्रद्धा होय. ते कृष्णभक्त होते. दिवसाचा बराच भाग ते भजनपूजनांत घालवीत. प्रसंगोपात ते मुसलमानांच्याही देवांस भजत असत. याप्रमाणें पाटिलबुवा रणशूर, युद्धकुशल, वाक्चतुर आणि धर्मभीरु असे महापुरुष होऊन गेले.

महादजींच्या अंगांतील मोठा दोष म्हणजे त्यांची फाजील महत्त्वाकांक्षा होय. वर नमूद केलेले सर्व गुण या महत्त्वाकांक्षेच्या लगामीं पडले. या भयंकर दोषाच्या अनुषंगानें सदैव राहणारे मत्सर, संशय, गर्व इत्यादि दुर्विकार मात्र पाटिलबावांचे ठिकाणीं अनावर झाले. धन्याचें ऐकावयाचें नाहीं हा ओनामा ते कोठें शिकले हें सांगतां येत नाहीं; पण आपण हा धडा शिकलों आहों हें त्यांनीं थोरल्या माधवरावांच्या वेळीं दाखविलें. पण माधवरावांची कदर मोठी जबरदस्त होती. तेव्हां महादजींचें कांहींएक न चालून त्यांस निमूटपणें पेशव्यांची आज्ञा मानणें भाग पडलें. नारायणराव मेल्यापासून तर पेशवाईंत बारभाईचा कारभार सुरू झाला, आणि त्यांच्या इच्छेला पाय फुटूं लागले. पुढें खुद्द राघोबादादा पेशवाई गहाण टाकण्यास तयार होऊन जेव्हां

सैरावैरा हिंडूं लागले तेव्हां दोन ब्राह्मणांच्या तंट्यांत आपला कार्यभाग उरकून घ्यावा, असें पाटीलबावांच्या मनांत येऊन आज राघोबाचा पक्ष, तर उद्यां सवाईमाधरावांचा आणि परवां इंग्लिशांचा, असें महादजींचें आचरण झालें ! सारांश, महादजींच्या कर्तेपणाला अनावर महत्त्वाकांक्षेची भर पडल्यामुळें मराठी राज्याला निराळें वळण लागलें. या कारणामुळें पेशव्यांच्या मुतालकीबद्दल शिंदे-होळकरांच्या पुण्यास लढाया होऊन मराठ्यांचें क्रूरत्व पुण्यनगरीस भोगावें लागलें व सरतेशेवटीं पेशवाईलाही नामशेष व्हावें लागलें !

चिंतामण गंगाधर भानु.

---

## २५. वातावरण.

पृथ्वीस सर्व बाजूंनीं हवेनें वेष्टिलें आहे. पृथ्वीच्या एकंदर पृष्ठभागापैकीं काय ते चारपंचमांश समुद्रानें आच्छादिले आहेत. परंतु या वायुरूप समुद्राचा सर्व पृष्ठभागास सारखा वेढा आहे. ज्याप्रमाणें समुद्राच्या तळाशीं घरटीं बांधून राहणारे कांहीं जलचर प्राणी आहेत, त्याप्रमाणेंच या वायुरूप समुद्राच्या तळाशीं आपलीं घरें बांधून आपण निर्वाह करीत आहों; परंतु बहुतेक जलचर प्राण्यास पोहत पोहत समुद्राच्या पृष्ठभागापर्यंत येतां येतें, तशी मात्र आपली किंवा पक्ष्यांची स्थिति नाहीं. पक्ष्यानें कितीही उंच उड्डाण केलें व आपण माणसांनीं कितीही उंच विमान उडविलें तथापि या वायुरूप समुद्राच्या तळापासून फारसे उंच म्हणजे फार झालें तर पांच सहा मैलांच्या पलीकडे आपणांस जातां येत

नाहीं; व या समुद्राच्या एकंदर खोलीच्या मानानें पाहिलें असतां पांच सहा मैल म्हणजे तिचा एक दशांशही नाहीं. तेव्हां या वायुरूप समुद्राच्या वरच्या प्रदेशांत काय चाललें आहे, हें आपणांस प्रत्यक्ष समजण्याला मुळींच मार्ग नाहीं. या प्रदेशाविषयींचें ज्ञान बहुतेक अनुमानसिद्ध आहे. या वायुरूप समुद्रास वातावरण म्हणतात.

वातावरणास जी समुद्राची उपमा दिली ती यथार्थ आहे हें तुमच्या सहज लक्षांत येईल. समुद्र आपणांस दिसतो, त्यामुळें त्याच्या अनंत लाटा, त्याची तुफानांतील खवळलेली स्थिति, त्याची भरती-ओहोटी व अशाच दुसऱ्या अनेक गति आपणांस प्रत्यक्षच दिसतात. वातावरणांत समुद्रापेक्षां शतपट मोठ्या व शतपटींनें विचित्र अशा गति क्षणोक्षणीं उत्पन्न होत आहेत. परंतु आपणांस वातावरण दिसत नाहीं, तेव्हा या गति अनुमानानेंच जाणिल्या पाहिजेत. जर कोणा मनुष्याच्या नेत्ररचनेंत विलक्षण फेर होऊन त्यास हें वातावरण आकस्मिकपणें दृश्य झालें, तर त्यास केवढा अचंबा व केवढें भय वाटेल! हवेचा यत्किंचितही भाग कोठें स्थिर नाहीं असें त्यास दिसेल. कारण अंधाऱ्या खोलींत, जेथें हवा अगदीं स्थिर आहे असें आपण मानितों, तेथें थोड्या सूर्यकिरणांनीं प्रवेश केला असतां असंख्य अणुरेणु हालत, चालत, फिरत आहेत असे जे आपणांस दिसतात ते या कल्पित मनुष्यास हवेच्या ओघांत सांपडल्यामुळें हलत आहेत असे दिसतील. जेव्हां मोठा वारा सुटतो तेव्हां अनेक रजःकणानीं भरलेला व पाठीवर पर्वताएवढाल्या मेघांच्या राशी घेऊन वाहणारा असा हवेचा प्रवाह क्षितिजापर्यंत सर्व स्थावरजंगम पदार्थांस

धुऊन बुडवून टाकीत आहे असें त्यास दिसेल. विजेचा चकचकाट होतांच त्या ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या वातावरणाच्या लाटा ध्वनिरूपानें जिकडे तिकडे फांकून, या शिखरावरून त्या शिखरावर परावर्तन पावल्यानें प्रतिध्वनिरूपानें सर्व दृश्य जग दणाणून टाकीत आहेत असें प्रत्यक्ष दिसेल ! परंतु त्यास व सर्वांस अत्यंत आश्चर्य वाटण्याजोगी गोष्ट आहे ती ही कीं, अनेक प्रकारच्या, अनेकदिशाप्रेरित, अनेक गति हवेमध्यें एकसमयावच्छेदेंकरून वास्तव्य करूं शकतात ! मोठा वारा वाहात आहे, विजेच्या गडगडाटाच्या लाटा चहूंकडे पसरत आहेत, वृक्षांचा व प्राण्यांचा सारखा किलबिलाट सुरू आहे, अशा वेळीं कोठें कोपऱ्यांत एकादा भुंगा आपल्या नाजूक पारदर्शक पंखांनीं हवेस कंपित करीत असल्यास, त्या कंपानें उत्पन्न झालेल्या सूक्ष्म लहरी अशा या खवळलेल्या हवेंतून भिन्नपणें पसरूं लागतात, व त्या आपल्या कर्णेंद्रियावर आपटल्यानें इतर सर्व ध्वनींहून भिन्न अशा एका मनोहर ध्वनीचें आपणांस ज्ञान होतें !

या वातावरणाची पृथ्वीच्या पृष्ठभागापासून किती उंची आहे हें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. अतिशय उंच असे ढग फार झाले तर पृथ्वीपासून सहा सात मैलांवर असतात. सूर्यास्तानंतर जो संधिप्रकाश राहतो त्यावरून वातावरण निदान पन्नास मैल उंच असावें असें दिसतें. परंतु उत्तरध्रुवाकडे ' आरोराबोरियालीस ' अथवा ' उत्तरेकडील अरुणोदय ' म्हणून जो विद्युज्जन्य प्रकाश वातावरणांत दिसतो त्यावरून, किंवा रात्रीं पडत्या ताऱ्यांप्रमाणें

भासणारे जे पदार्थ वातावरणातून जातांना दिसतात त्यांच्या गतीवरून गणित केलें असतां वातावरणाची उंची निदान ३०० मैल तरी असावी असें सिद्ध होतें ! परंतु या विषयाचा विशेष विचार एथें करितां येत नाहीं, आणि वस्तुतः पाहता पृथ्वीच्या पृष्ठभागापासून पन्नास मैलांपलीकडे जरी वातावरण असलें, तथापि तें इतकें विरळ असलें पाहिजे कीं, तें आपणास असून नसून सारखेंच होय.

महादेव शिवराम गोळे.

---

## २६. आर्यांचें नौकानयन.

जुन्या काळीं नौकानयनाची विद्या व व्यवहार आपल्या देशांत उत्कर्षाला पोंचलेला होता, असें सप्रमाण सिद्ध करणारें एक पुस्तक बंगालच्या नॅशनल कॉलेजचे प्रोफेसर राधाकुमुद मुकरजी यांनीं अलीकडे प्रसिद्ध केलें आहे. प्रोफेसर मुकरजी यांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, कमींत कमी दोन हजार वर्षेंपर्यंत हिंदुस्तान हा देश नौकानयनविद्येचें आणि समुद्रावरील व्यापाराचें एक केंद्रस्थान होता !

कोणत्याही प्रमेयाला एक प्रत्यक्ष व दुसरा अप्रत्यक्ष असे दोन प्रकारचे पुरावे असतात. प्रो. मुकरजी यांच्या प्रमेयास दोनही प्रकारचा पुरावा मिळतो. पैकीं प्रत्यक्ष पुरावा संस्कृत व प्राकृत ग्रंथ यांतून, आणि ग्रंथांइतकींच किंबहुना त्यांहून अधिक प्रमाणभूत अशीं जुनीं शिल्पकलेचीं कामें, चित्रें, तसबिरा, नाणीं यांतून मिळतो. उदाहरणार्थ, कलकत्त्याच्या संस्कृत कॉलेजाच्या ग्रंथसंग्रहालयांत प्रो० मुकरजी यांना भोज—नरपतिकृत ‘ युक्ति-

कल्पतरु ' नामक ग्रंथ मिळाला. यांत जहाजें कोणत्या लांकडांचीं बांधावीं ? तीं कशीं बांधावीं ? तीं लांबरुंद कोणत्या प्रमाणानें असावीं ? सामान्य व विशेष प्रकारच्या जहाजांचे उपयोग काय ? जहाजांतील सामानसुमान काय व कसें असावें ? त्यांना बाहेरून व आंतून शोभा कशी आणावी ? जहाजांत बसून जाणाऱ्या लोकांच्या सुखाकरितां सोयी कशा कराव्या ? वगैरे सर्व विषयांचें पद्धतशीर वर्णन आहे. जहाजांतील मंदिरें, हिरे-मोत्यांनीं श्रृंगारण्यापासून लढाईच्या प्रसंगीं जहाजांची सिद्धता कशी ठेवावी येथपर्यंत या ग्रंथांत वर्णन सांपडतें. अर्थात् हें काल्पनिक नसून अनुभवसिद्ध आहे असें म्हटलें पाहिजे. वेदामध्यें नौकानयनाचे उल्लेख आहेत. भारतांत पांडव बसून गेलेल्या नौकेचें वर्णन " सर्ववातसहां नावं यंत्रयुक्तां पताकिनीम् " या शब्दांनीं सांपडतें. रामायणांत ( अयोध्याकांड ) लढाऊ नावांचा उल्लेख आहे. भागीरथीच्या पात्रांत युद्ध करणाऱ्या नौकांचा उल्लेख रघुवंशांत आहे. ' राजपल्लीये ' नामक पाली ग्रंथांत बंगालच्या सिंहबाहू राजाचा मुलगा विजय ज्या जहाजांतून गेला त्याचें वर्णन आहे; तसेंच सिंहलराजा ज्यांतून जंबुद्वीपाहून सीलोनला गेला, त्या जहाजाचें वर्णन आहे. त्यावरून सातशें आठशें व्यापारी व मुशाफर नेण्यायेवढीं तीं जहाजें मोठीं होतीं असें दिसलें. जातक ग्रंथामध्येंही असेच पुरावे सांपडतात.

सांची येथील बौद्ध स्तूपावरील चित्रांत जहाजांचीं स्वच्छ चित्रें आहेत. कान्हेरी येथील लेखांत समुद्रप्रवासाचा देखावा कोरलेला असल्यामुळें इसवी सनाच्या पहिल्या दुसऱ्या शतकासंबंधानें हा पुरावा

ग्राह्य होय. पुरी येथील जगन्नाथाच्या देवळांत आणि बिंदुसरोवर येथील भुवनेश्वराच्या देवालयांत प्रो० मुकरजी यांना असाच शिल्पमय पुरावा मिळाला. अजिंठा येथील कोरींव लेण्यांत हाच पुरावा मिळतो. नंबर एकच्या गुहेंत एक चित्र आहे, त्यांत सातव्या शतकांत पुलकेशी राजाकडे आलेला इराणचा राजा खुसरू याचा वकील आपलें अधिकारपत्र सादर करीत आहे, असा देखावा असल्याचें मानतात. याचा अर्थ असा कीं, इराणपर्यंत आमचें दळणवळण व दाराही होता. ग्रिफिथ्स यानें अजिंठा येथील लेण्यांतील इतर कित्येक चित्रांवरून त्या वेळीं व त्यापूर्वी परदेशांशीं असलेल्या हिंदुस्तानच्या व्यापाराचें अनुमान काढलेलें आहे. सातव्या आठव्या शतकांत जावा, कंबोडिया, सयाम, चीन व जपान येथपर्यंत हिंदी लोकांच्या सफरी होत व कांहीं ठिकाणीं वसाहतीही झाल्या होत्या. फिलेडेल्फिया येथील ग्रंथसंग्रहालयांत हिंदु पद्धतीच्या जहाजाचा एक नमुना पहावयास सांपडतो. तसेंच आंध्रकालीन कित्येक नाणीं सांपडतात, त्यांजवर जहाजांचीं चित्रें आहेत. आणि या कालासंबंधानें, म्हणजे यज्ञश्रीराजाच्या कारकीर्दीत, हिंदुस्तानचा व्यापार पश्चिमेकडे ग्रीस, रोम, इजिप्तपर्यंत व पूर्वेस चीनपर्यंत चालत होता, असें सेवेलसाहेबाचें मत आहे. कारोमंडल किनाऱ्यावर कुरुंवर अथवा पल्लव राजांच्या काळचीं अशींच नाणीं सांपडतात, व या राज्यांच्या काळीं परदेशांशीं आमचा व्यापार चालत होता, असेंच सर वॉल्टर ईलियट यांनीं अनुमान काढलें आहे.

प्रत्यक्ष पुराव्याप्रमाणें अप्रत्यक्ष पुराव्याचाही परिश्रमपूर्वक शोध

व उपयोग प्रो. मुकरजी यांनीं केला आहे. वरुणाला सर्व समुद्र-पथांची माहिती होती. व्यापारी लोक सफरीचे धोके मनांत न आणितां समुद्राच्या सर्व भागांवर जात. तुर्गाचा मुलगा भुज्जू यानें शत्रूवर स्वारी केली असतां त्याचें जहाज फुटलें व शंभर वल्ह्यांनीं वल्हविलेल्या नावेंत अश्विनांनीं त्याला उचलून घेतलें, असे उल्लेख ऋग्वेदांत आहेत. रामायणांत लोहितसागर, यवद्वीप, सुवर्णद्वीप यांचे उल्लेख आहेत; ते हिंदी लोक दूरच्या सफरी करणारे नसते तर आले नसते. सहदेवानें ताम्रद्वीपांतील लोक जिंकले, व सागरद्वीपवासीयांना वश केलें, याचें मर्म उघड आहे. धर्मसूत्रांत परदेशगमनाचा ब्राह्मणांपुरता निषेध सांगितलेला असे; तथापि ज्या वैश्यांना परदेशगमन खुलें होतें ते हिंदुस्थानांतीलच होत. समुद्रावरून आणलेल्या मालावर जकात किती घ्यावी, नाविक लोकांनीं नुकसानी कोणती व किती भरून द्यावी, अशाविषयीं स्मृतिग्रंथांतील व्यवहाराध्यायांत नियम सांपडतात. बृहत्संहितेंत समुद्रयानासंबंधीं ज्योतिषशास्त्रदृष्ट्या उल्लेख आहेत. पुराणांतून व काव्यांतून सांपडणारे असले उल्लेख पुष्कळांच्या वाचण्यांत येण्यासारखे आहेतच. रत्नावलींतील सिलोनची राजकन्या समुद्रांत जहाज फुटून वाहात चालली असतां दर्यावर्दी व्यापाऱ्यांनीं कौशांबी येथें आणिली असल्याचें सांगितलें आहे. दशकुमारचरितामध्यें रत्नोद्भव आणि मित्रगुप्त यांच्या समुद्रावरील सफरींच्या गोष्टी आहेत. शिशुपालवधामध्यें, श्रीकृष्ण द्वारकेहून हस्तिनापुराला जात असतां वाटेंत अनेक देशचे व्यापारी जहाजांतून माल भरून जात असलेले त्यानें पाहिले, असें वर्णन

आहे. अशाच रीतीचे अप्रत्यक्ष उल्लेख जातक वगैरे बौद्ध ग्रंथांतून सांपडतात.

युरोपियन ग्रंथकारांनींही हिंदुस्तानच्या परदेशी व्यापारासंबंधानें ठिकठिकाणीं लिहिलें आहे. डॉ. साईस यांच्या मतें हिंदुस्तान व ॲसीरिया देश यांच्या दरम्यान ख्रिस्ती शकापूर्वी तीन हजार वर्षे व्यापार सुरू होता. प्राचीन बॅबिलोन शब्दसंग्रहांत ' सिंधु ' हा शब्द एक प्रकारच्या मलमलीच्या कापडाला लाविलेला आढळतो. नेबुचॅडनेझार या प्रसिद्ध बॅबिलोनी राजाच्या राजवाड्यांत फक्त हिंदुस्तानांत सांपडणाऱ्या अशा कित्येक जातीच्या लांकडांचीं तुळवटें असल्याचा एकानें शोध लाविला आहे ! ख्रिस्तापूर्वी पांचव्या शतकांत तांदूळ, मयूर, चंदन वगैरे पदार्थ त्या वेळच्या हिंदी नांवांनींच ग्रीसमध्यें उल्लेखिले जात. प. वा. जॅक्सनसाहेब यांनीं मुंबईच्या गॅझिटिअरमध्यें असें प्रसिद्ध केलें आहे कीं, भडोच व सुपाराबंदर यांच्या व बॅबिलोनियाच्या दरम्यान, ख्रिस्तापूर्वी आठव्या, सातव्या व सहाव्या या शतकांत सर्रास व्यापार चालत असे. इजिप्त व हिंदुस्तान यांमध्यें पूर्वी चाललेल्या व्यापारासंबंधीं कोणासच शंका नाहीं. या व्यापाराचा अप्रत्यक्ष पुरावा बायबलच्या जुन्या करारांत सांपडतो ! बायबलांतील किंग सॉलोमन व किंग हिरॅम यांच्या काळीं असणारे व्यापाराचे कित्येक मौल्यवान् जिन्नस दक्षिण हिंदुस्तानच्या जमिनींत पिकत होते, असें रे. फूक्स यांचें म्हणणें आहे. हिरोडॉटस् वगैरे ग्रीक ग्रंथकारांच्या ग्रंथांतून असेच उल्लेख सांपडतात. अलेक्झांडर सिंधुनदींतून पार झाला तेव्हां त्याला हिंदु-

स्तानांत बांधलेलीं एक हजार जहाजें मिळालीं ही गोष्ट तर ऐतिहासिकच आहे !

मौर्यराजांच्या कारकीर्दींत हिंदुस्तानांत मोठमोठ्या गोद्यांमधून जहाजें बांधण्याचा मोठा धंदा चाले असा पुरावा सांपडतो. चंद्रगुप्ताच्या अठरा कारखान्यांपैकीं हा एक सरकारी कारखानाच होता, व बंदरांतील जकातीच्या नियमांचा तर एक ग्रंथच होण्यासारखा आहे ! अशोकाच्या वेळीं सीरिया, इजिप्त, ग्रीस व सीलोन येथपर्यंत समुद्रावरील दळणवळण होतें आणि सैन्याप्रमाणें अशोकाच्या पदरीं मोठें आरमारही असावें, असें व्हिन्सेंट स्मिथ या इतिहासकाराचें म्हणणें आहे. ख्रिस्तापूर्वी दुसऱ्या तिसऱ्या शतकांत आंध्र राजांच्या कारकीर्दींत दक्षिणहिंदुस्तान व रोम यांच्या दरम्यान सर्रास व्यापार चालत असे. दक्षिणहिंदुस्तानांतून कलाकुसरीचा माल विकत नेऊन त्याच्या मोबदला रोमच्या व्यापाऱ्यांनीं दिलेलीं सोन्याचीं नाणीं तिकडील भूमींत अजून सांपडतात. मुसलमानांचें राज्य हिंदुस्तानांत होईपर्यंत बंगालच्या उपसागराच्या किनाऱ्यावरील लोक सीलोन, जावा, सुमात्रा व चीन येथपर्यंत जाऊन वसाहती करीत. पश्चिमेकडील सौराष्ट्रांतील लोक इराणकडील मुख्य शहरीं वसाहती करून व आपला धर्म संभाळून रहात, असें चीन देशांतील प्रवासी हुअॅनसँग यानें लिहिलें आहे. पूर्वेकडे बौद्ध धर्माचा प्रसार करण्याकरितां हिंदी भिक्षु—धर्मोपदेशक चीन व जपानपर्यंत गेले होते, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. बोधिसन नांवाचा बौद्ध भिक्षु आठव्या शतकांत जपानांत जाऊन जपानी भिक्षुकांना संस्कृत शिकवीत राहिला होता.

याच सुमारास दोघां हिंदी गृहस्थांनीं जपानांत कापसाची लागवड सुरू केली असा उल्लेख जपानी सरकारी दप्तरांत आढळतो. दहाव्या शतकांत झालेल्या चोलवंशीय राजांचा ताबा व दरारा समुद्रावरही असे, व एका चोल राजाच्या कारकीर्दींत तर लखदीव, मालदीव वगैरे शेंकडों बेटें त्याच्या आरमारानें काबीज केलीं होतीं. यानंतर झालेल्या काळासंबंधानें विशेष सांगण्याचें प्रयोजन नाहीं. मोंगलांच्या कारकीर्दींत व त्यानंतर पुढेंही कांहीं थोडे दिवस समुद्रावरील व्यापार सुरू असून खुद्द मराठ्यांचें खास आरमार होतें; व गेल्या दोन तीन शतकांत पोर्तुगीज, डच व इंग्लिश यांच्याशीं असलेलें दर्यावर्दी हिंदी लोकांचें दळणवळण व परस्परांच्या आरमारावरील लढाया यांचीं वर्णनें इतिहासांत वाचावयास मिळतात. आयने अकबरींत मोंगलांच्या आरमारखात्याचें उत्कृष्ट वर्णन सांपडतें; 'मराठ्यांचें आरमार' नांवाच्या आधुनिक मराठी निबंधांत या विषयाची बरीच माहिती एकत्र वाचावयास मिळते.

इंग्रजांच्या कारकीर्दींत पहिल्यापहिल्यानें इकडे जहाजें बांधण्याच्या धंद्यास पुष्कळच उत्तेजन मिळालें. सन १७३५ सालापर्यंत सुरतेस जहाजें बांधण्याची गोदी चालू होती; त्यानंतर ती मुंबईस चालू झाली. मुंबईच्या जहाजें बांधण्याच्या कारखान्यावर लावजी नसरवानजी या नांवाचा पारशी होता व त्याच्या देखरेखीखालीं इंग्रज सरकारचीं इकडील सर्व जहाजें बांधलीं जात. इ० स० १८०२ सालीं इंग्रजांना लढाऊ जहाजें बांधावयाचीं होतीं, त्याकरितां युरोपांतून कामगार आणावे, असें चाललें होतें; पण तसें करण्याचें कारणच पडलें नाहीं. उलट लावजीशेटनें बांधलेल्या जहाजांची

कीर्ति युरोपांत पसरली. यापूर्वी १७७५ सालीं मुंबईची गोदी पाहून इतकी मोठी व सोईस्कर गोदी सर्व युरोपांत नाहीं असें एकानें लिहिल्याचा दाखला सांपडतो. मुंबईस जहाजें बांधण्याला विलायतपेक्षां पाऊणपट खर्च कमी येतो, व शिवाय मुंबईंत बांधलेलीं जहाजें विलायतेंत बांधलेल्या जहाजांपेक्षां तिप्पट टिकतात, असे सरकारी उल्लेख सांपडतात ! कलकत्त्याच्या हुगळी नदीवरील गोदींत १८७६ पर्यंत बरींच मोठीं जहाजें बांधलीं जात. पण सन १८६० पासून या धंद्यास विलायतेंत तेजी येऊन इकडे मंदी आली. सन १८११ सालीं एका फ्रेंच गृहस्थानें हिंदी कारागिरीसंबंधानें खालील आशयाचे उद्गार काढले आहेतः—"इंग्रज लोकांनीं हिंदु कारागिरीपासून जहाजें बांधण्याच्या विद्येंत अनेक नमुने उचलले आहेत. हिंदी जहाजांत सौन्दर्य व उपयुक्तता हीं दोनही साधलेलीं असतात."

नरसिंह चिंतामण केळकर.

---

## विलक्षण स्वामिनिष्ठा.

भाऊसाहेबांचा मोड होऊन ते दिसेनासे झाले व निशाण पडलें, तेव्हां पार्वतीबाईचें देहभान सुटून तिणें पळ काढला. कोठें जावें, कोणत्या बाजूनें निघावें, हें तिला सुचेना. पळा, पळा, पळा, म्हणोन हुल्लड सुरू झाली व गिलचे पाठलाग करूं लागले. आतां या लांडग्यांच्या हातून मी कशी सुटतें या विचारानें तिचें काळीज थर थर कांपूं लागलें. विसाजी जोगदंड पांचशें धनगरांनिशीं तिच्या संरक्षणार्थ भाऊसाहेबांनीं ठेविला होता, तो या प्रसंगीं इमानास जागला नाहीं.

त्यानें बाईची वास्तपुस्त न करितां दिल्लीचा रस्ता यापूर्वींच धरला होता. इमानी किंवा घातकी, खंबीर किंवा घाबरट मनुष्याची पारख प्रसंगाला होते. विसाजी जोगदंडाचें नांव बखरींत एका प्रकारानें प्रसिद्ध आहे तर जानू भिंताडयाचें नांव दुसऱ्या प्रकारानें प्रसिद्ध आहे. भिंतीसारखा रुंद व उंच असल्यामुळें त्यास भिंताड्या म्हणत, पण त्याचें काळीजही भिंतीसारखें रुंद होतें. त्यानें या वेळेस इतकी प्रशंसनीय कामगिरी केली कीं, पेशव्यांच्या घराण्यावर त्यानें थोर उपकारच केले असें म्हटलें असतां चालेल. विश्वासरावांची स्त्री पूर्वींच वारली होती. संग्रामांत पेशव्यांच्या घराण्यांतील पार्वती-बाईच शिल्लक होती. ती जर गिलच्यांच्या हातीं लागती तर पेशव्यांचा किती तरी दुर्लौकिक झाला असता ! भाऊसाहेबांच्या कीर्तीस, पराक्रमास, शहाणपणास तर काळिमाच लागला असता ! या अनर्थांतून पेशवाईस जानू भिंताड्यानें वांचविलें. त्याचें इमान, त्याचें धैर्य, त्याची शक्ति, सर्व महाराष्ट्रास महनीय आहेत. असो. भाऊंच्या सैन्याच्या मागें पार्वतीबाई हत्तीवर अंबारींत होती. तिच्या समागमें नानाफडणिसांची मातुश्री व स्त्री हत्तीवरच होत्या. माहुतानें हत्ती पळाच्या रस्त्यानें काढला तों त्याजवर दोन चार गोळ्या पडल्या. तेव्हां हत्तीवर दम निघेनासा झाला. हत्तीवरून पळणें शक्यच नव्हतें. हत्ती खालीं बसविला व पार्वतीबाई खालीं उतरून धूम पळूं लागली. नानाफडणिसांच्या मंडळीचें काय झालें याची चौकशी करण्याससुद्धां तिला फुरसत झाली नाहीं. जवळ घरचा पोऱ्या घोडी घेऊन उभा होता. त्यानें " घोडीवर बसा " असें म्हटलें, पण त्याचेंही भान तिला राहिलें नाहीं. जानू भिंताड्या

मात्र तिच्याबरोबर धांवला. बाईच्यानें कोठवर पळवेल ? बिचारी थकून खालीं बसली. तेव्हां जानूनें पाठीस घेऊन अर्धा कोस नेली. चारी बाजूंनीं माणसें पळतच होतीं. कोणी घोड्यावर, कोणी पायीं, कोणी धमनींत असे दिल्लीच्या रोखानें पळत सुटले होते. तितक्यांत एखाद दुसऱ्या पठाणानें येऊन कत्तल करावी, डागदागिने घेऊन जावें, घोडे घेऊन जावें. याप्रमाणें चारी बाजूंला मुर्दे पडत होते. पण बाईचें नशीब थोर असल्यामुळें ती निभावत चालली. इतक्यांत वाखेकर नांवाचा एक शिलेदार मोठ्या खंद्या घोड्यावर स्वार असलेला जात होता तो दिसला. त्यास पार्वतीबाईनें "मी भाऊसाहेबांची स्त्री आहें, मला घेऊन चलावें" म्हणोन म्हणतांच त्यानें घोडें उभें केलें व बाईस हात देऊन रिकिबीवरून मागें बसविलें व शालूनें तिला पाठीशीं बांधून घेतलें. धन्य भाऊसाहेबांची ! त्यांजवर त्यांच्या फौजेंतील मनुष्यांची किती निष्ठा व प्रीति होती याची कल्पना यावरून होईल. वाखेकरानें चोहोंबाजूंस नजर फेंकली तों गर्दी दिसूं लागली. पण "नशीब बाईचें" असें म्हणोन त्यानें बेलाशक घोडा फेंकला. जानू भिंताडा हा चौफेर घोड्याची लेंडी धरून धांवत होता! तिघांच्या नशिबानें व भाऊसाहेबांच्या पुण्याईनें वाखेकराचा घोडा पाठलाग करणाऱ्यांच्या कचाट्यांतून निसटून गेला, तेव्हां घोडें सावकाश चालविलें, तों अस्तमान झाला. काळोख पडूं लागला. वाखेकराच्या जिवांत जीव आला. त्यानें बिनधास्त बाईस तीन चार कोस वाहून नेलें; पण त्याचें घोडें थकलें. तेव्हां बाईस घोड्याखालीं उतरून घेऊन जानूनें पुन्हां आपल्या पाठोंगळीस मारिलें, त्याच्या मेहनतीची व स्वामिभक्तीची

त्यानें कमाल केली. पुन्हा एक मजबूत घोडेस्वार भेटला. त्याच्या घोड्यावर बसवून दोनतीन कोस नेवविलें. रात्रीचा वेळ असल्यानें पळणारास एक प्रकारें फायदा तर दुसऱ्या ारें नुकसान होतें. आस्ते जावें लागे. तरी रणभूमीपासून चांदण होतें तोंवर बाई बरीच दूर आली. पाठलागाची भीति नाहींशी झाली. पण मुक्काम करण्याची सोयच नव्हती. दुसरे दिवशीं सकाळीं गिलचे पाठलागास पुन्हा सुटतील हें त्यांस स्वप्न पडून चुकलें होतें. जानू रस्त्याचा माहितगार होता. एके ठिकाणीं थांबून पाणी पिऊन घटकाभर विश्रांति घेतली आणि बाईस पुन्हा चालविली. कांहीं पाठीवर, कांहीं पायीं, कांहीं कोणाच्या घोड्यावर, अशा रीतीनें प्रवास करून दुसऱ्या दिवशीं प्रहर दिवसास होळकराचे स्वार, नाना पुरंदरे व कांहीं हुजरातीचे स्वार जमाव धरून मुक्काम केलेले दिसले, त्यांत त्यानें तिला नेऊन पोंचविली. बाईस पाहतांच सर्वांस जो आनंद झाला तो अवर्णनीय होय. नाना पुरंदऱ्यानें आनंदाचे भरांत जानू भिंताड्यास आलिंगन दिलें व त्यास कडींतोडे देऊन त्याचा फारच गौरव केला. याप्रमाणें पार्वतीबाईची पांचच प्रहरांची भयंकर साडे-साती संपून तिची सर्व व्यवस्था तिच्या भाग्याप्रमाणें लागली.

चिंतामण विनायक वैद्य.

---

## २८. थोरांचीं चरित्रें.

तुमच्या मनांवर अनेक गोष्टींचा संस्कार होत असतो. आई-बापांचें वर्तन, गुरूचें आचरण, मित्रांची चालचलणूक, शेजाऱ्या-पाजाऱ्यांची वागणूक व समाजांतील व्यवहार यांचा तुमच्या मनां-

वर एकसारखा परिणाम होत असतो व त्याच्यायोगानें तुमचीं मनें केव्हां केव्हां तुम्हांला न कळतही, तयार होत असतात. त्याप्रमाणेंच तुम्ही जीं पुस्तकें वाचितां त्यांचाही संस्कार हळूहळू तुमच्या मनांवर घडत असतो. अशा पुस्तकांमध्यें थोर पुरुषांच्या चरित्रांना मी अग्रस्थान देतों. थोरांचीं चरित्रें मनन करून, कालदेश पाहून, अनुकरण करण्यासारखीं असतात. त्यांच्या चरित्रांतील मुख्य मुद्याच्या गोष्टी कोणत्या, त्यापासून काय बोध घ्यावयाचा अशा दृष्टीनें तीं चरित्रें वाचिलीं पाहिजेत. रामदासस्वामी, तुकारामबोवा, शिवाजीमहाराज, नानाफडणवीस, महादजी शिंदे, मल्हारराव होळकर, श्रीमती अहिल्याबाई, श्रीमती लक्ष्मीबाई, बापू गोखले, तानाजी मालुसरे, रामशास्त्रीप्रभुणे इत्यादि थोर माणसांच्या चरित्रांचा व तुमचा थोडाबहुत तरी परिचय असेल; पण हीं चरित्रें मार्मिकपणें वाचलेलीं मुलें तुमच्यांत फारशीं सांपडणार नाहींत असें वाटतें. शिवाजीमहाराजांनीं तोरणा किल्ला अमक्या सालीं घेतला, नानाफडणवीस अमुक सालीं निवर्तले, अहिल्याबाई खंडेरावांची बायको व मल्हाररावांची सून होती, रामशास्त्री पेशवाईंत न्यायाधीश होते अशा अशा प्रकारची माहिती तुम्हांला तोंडपाठ असते. पण ही माहिती विशेष महत्त्वाची नाहीं. चार अडाणी मावळे संवगडी एकत्र करून एक पाटलाचा मुलगा दिल्लीपतीशीं झुंज करून महाराष्ट्राचा संस्थापक व अधिपति होतो हें कसें? राम्या शागिर्दाला रामशास्त्रीबोवा कसें होतां आलें? कोणतीं अलौकिक कृत्यें करून अहिल्याबाईनें होळकरवंशाची कीर्ति अजरामर करून ठेविली? लक्ष्मीबाईसाहेब यांना आपल्या अंतःकरणांत उच्चस्थान कायमचें मिळालें आहे तें

कशामुळें ? भट्ट, विंचूरकर, राजेबहाद्दर, पटवर्धन, गोखले, इत्यादि ब्रह्मकुलांत उत्पन्न झालेल्या कित्येक महाराष्ट्रीयांत क्षात्रतेजानें कसा संचार केला ? 'पाटिलबोवा' व 'सुभेदार' या पदव्यांत कोणती जादू भरलेली आहे ? रामदासांनाच समर्थ कां म्हणतात ? सगळ्या जगांतील मुत्सद्दी, कवि व तत्त्ववेत्ते यांच्या मालिकेंत नाना, तुकारामबोवा व शंकराचार्य यांस स्पृहणीय उच्चस्थान कसें प्राप्त झालें ? हे व असेच दुसरे प्रश्न तुम्हीं सोडविले पाहिजेत. अशाप्रकारें प्रश्न सोडविण्याची पात्रता अंगीं येण्याला तुम्हीं चरित्रें काळजीपूर्वक व मार्मिक रीतीनें वाचलीं पाहिजेत. एखादें कार्य तुमच्या नजरेस पडलें म्हणजे त्याच्या कारणाकडे तुमचें लक्ष्य गेलें पाहिजे; व कार्य आणि कारण यांतील संबंध कितपत जुळतो हेंही तुम्हीं विचार करून पाहिलें पाहिजे.

लक्ष्मण गणेशशास्त्री लेले.

---

## २९. नायगाराचा धबधबा.

आकर्षणशक्ति, उष्णता, तेज, आकार व परिमाण यांचें प्राचंड्य लक्षांत भरण्यास नभोमंडलांत कालोत्पत्तीपासून परिभ्रमण करणाऱ्या सूर्यबिंबाचें आणि तदवलंबी ग्रहमालेंतील मण्यांचें वर्णन वाचलें पाहिजे. त्यावरून मनुष्याच्या सामर्थ्याची, बुद्धीची आणि कर्तृत्वाची क्षुद्रता सहज अंतःकरणांत उतरेल यांत संशय नाहीं. आकाशस्थ कोणत्याही गोलाचें अवलोकन व चिंतन केलें असतां मनाची तशी वृत्ति झाल्याशिवाय राहणार नाहीं. पण अशी लीनता उत्पन्न होण्यास नेहमीं खगोलाचाच आश्रय केला पाहिजे

असें नाहीं. या आपल्या भूगोलावरही अशा अद्भुत सृष्ट वस्तु आहेत कीं, त्यांच्या साक्षात् अवलोकनानें किंवा चिंतनानें मनावर तसा परिणाम घडूं शकेल. नायगाराचा धबधबा तशा प्रकारची वस्तु आहे. अशा वस्तूंच्या प्रत्यक्ष अवलोकनापासून होणाऱ्या आनंदाचा एकशतांशही त्यांच्या वर्णनापासून होईल कीं नाहीं याची शंका आहे. तथापि ज्यांना अशा वस्तु पाहाण्यास मिळण्याचा संभव नाहीं, अशांनीं त्यांच्या वर्णनांतच समाधान करून घेतलें पाहिजे हें उघड आहे.

उत्तर अमेरिकेच्या उत्तर प्रदेशांत जो प्रसिद्ध कासारसमूह आहे, त्यांत इरी आणि आंतेरिओ अशीं दोन विशाळ सरोवरें आहेत. यांपैकीं पहिलें समुद्रपृष्ठभागापासून ५७३ फुटांच्या उंचीवर असून नायगारा नदीचें जनकत्व त्याच्याकडे आहे. नायगारा नदी इरी सरोवरापासून उगम पावून सुमारें ३३ मैल भूम्याक्रमण केल्यावर आंतेरिओ सरोवरास जाऊन मिळते. उगमापाशीं नायगाराचें पात्र सुमारें तीन चतुर्थांश मैल रुंद आहे. या स्थितींत दोन मैल प्रवास केल्यावर, ती दोन शाखांनीं ग्रांड आयलंड नांवाच्या बेटास प्रदक्षिणा करून झपाट्यानें पुढें निघते, व पुनः एकत्र झालेल्या पात्राचा संकोच करून मोठ्या वेगानें वाहूं लागते. ग्रांड आयलंड बारा मैल लांब व दोनपासून सात मैल रुंद आहे. या बेटापासून धबधब्याचें अंतर सुमारें दीड मैल आहे व तेवढ्यांत त्याला साठ फुटांचा उतार आहे. कड्यावरून खालीं पडूं लागण्यापूर्वीं अजाद्वीप ( गोट आयलंड ) नांवाच्या सुमारें ४० फूट उंचीच्या व १००० फूट रुंदीच्या लहानशा बेटानें तिचे पुनः

दोन भाग होतात. यांपैकीं क्यानडाकडील भागाची रुंदी सुमारें २८००० फूट असून त्याला घोड्याच्या नालाचा आकार असल्यामुळें हॉर्सशू म्हणतात. अमेरिकेकडील भागाची रुंदी सुमारें १४००० फूट असून तो सरळ आहे. यावरून कड्याच्या माथ्याशीं दिसण्यांत दोन धबधबे दिसतात, हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. क्यानडाच्या बाजूचा धबधबा १५० फूट खोल आहे, व अमेरिकेच्या बाजूला १६४ फूट आहे. प्रत्येक मिनिटास या ठिकाणीं पाण्याच्या १,८०,००,००० घनफुटांचा अधःपात होत असावा, व त्याचें वजन सुमारें २५,००,००० खंडी असावें, असा दीर्घोद्योगी गणितज्ञांचा अजमास आहे! कड्यावरून खालीं उतरल्याबरोबर पात्राची रुंदी अगदीं संकुचित होऊन, तें १००० फुटांच्या रुंदीच्या खोल दरींतून वाहूं लागतें. धबधब्यापासून सात मैलांच्या आंत या दरीची रुंदी ७५० पासून १२०० फुटांपर्यंत आहे व हिच्या किनाऱ्याची उंची २०० पासून ३५० फूट आहे. पाण्याच्या घर्षणामुळें दरीचें तोंड नित्य थोडथोडें घांसून जात असल्याकारणानें, तें प्रतिवर्षीं मागें हटत चालल्याचीं चिन्हें कांहीं ठिकाणीं स्पष्ट दिसतात. १८४१ पासून तें सुमारें १०० फूट मागें सरलें आहे. या दरीमुखावरून कित्येकांनीं असें काढलें आहे कीं, ही नदी कमींत कमी दहा लक्ष वर्षें वहात असावी! धबधब्याच्या तळाजवळचा दगड वरच्या दगडापेक्षां मोखर असल्यामुळें पाण्याच्या आघातानें तो घांसून जाऊन त्यांत मोठमोठीं वायुविवरें ( Caves of Winds ) झालीं आहेत. धबधब्यापासून २५० यार्डांवर पादचारी लोकांसाठीं १८६९ त बांधलेला एक

झुलता पूल आहे. हा १२६८ फूट लांब व पाण्यापासून १९० फूट उंच आहे. याशिवाय सुमारें दीड मैलाच्या अंतरावर दुसरे दोन आगगाडीचे झुलते पूल आहेत. त्यांपैकीं पहिला १८५५ त बांधला व दुसरा १८८३ त संपविण्यांत आला. पहिल्याची लांबी ८२१ फूट, रुंदी ४० फूट व पाण्यापासून उंची २४५ फूट असून, रेलवेच्या खालीं १८ फूट रुंदीचा माणसें व साध्या गाड्या जाण्याच्या सोईचा रस्ता केला आहे. दुसऱ्या पुलावर दोन आग-गाड्या चालण्यासाठीं चार रेल घातले आहेत! तेव्हां आतां नदीच्या सामर्थ्याची विशेष तारीफ करावी कीं, अमेरिकन लोकांच्या अकलेची आणि परिश्रमाची विशेष तारीफ करावी, अशी शंका उत्पन्न होते!

एणेंप्रमाणें या जगत्प्रसिद्ध धबधब्याची कच्ची हकीकत आहे. ती वाचून ज्यास जेवढी करमणूक होईल तेवढींत त्यानें संतोष मानून घेतला पाहिजे. पण ज्यास तो प्रत्यक्ष पाहण्याचा लाभ होतो त्यास त्याच्या दर्शनानें अत्यानंद होऊन कृतकृत्यता वाटते. इरी सरोवरापाशीं नायगारेची जी मंद गति आहे ती पाहून मनांत असा तर्क येतो कीं, माहेराहून सासरीं जाणें हिला अगदीं नकोसें असल्यामुळें ही अशी रेंगाळत आहे कीं काय कोण जाणे? पण हें तिचें रेंगाळणें फार वेळ टिकत नाहीं. थोड्या वेळांत पति-दर्शनाच्या आनंदलहरी तिच्या हृदयांत येऊं लागून तिचें पाऊल वेगानें पुढें पडूं लागतें, व प्रत्येक पावलास पुढें जाण्याची तिची उत्कंठा अधिकच तीव्र होते. मनाच्या अशा स्थितींत असणाऱ्या स्त्रीस कोणीं अडथळा केला असतां तिचा क्षोभ होऊन ज्याप्रमाणें

ती अडथळा करणारावर मोठ्या रागानें चवताळून जाते, त्याप्रमाणें अजाद्वीपाचा प्रतिरोध प्रियदर्शनार्थ उतावीळ झालेल्या या चपलेस दुःसह होऊन ती क्रोधानें इतकी फणफणूं लागते कीं, तिचें तें भयानक स्वरूप पाहून व गर्जना ऐकून प्रेक्षकांच्या अंगावर कांटा उभा राहतो ! अजाद्वीपास हिसडा देऊन जेव्हां ती १५० फूट उंचीच्या कड्याखालीं उडी घेते, तेव्हां तिला जे रागाचे कल्लोळ येतात त्यामुळें दशदिशा भरून जाऊन आसमंतांतील इतर ध्वनि पंचत्वाप्रत पावल्यासारखे भासतात ! क्रोधाग्नीनें सर्व उदकसंचय अत्यंत तप्त होऊन त्यास उसळ्या येत आहेत कीं काय, व त्यांतून स्फटिकासारख्या शुभ्र व हिऱ्यासारख्या तेजोमय अंबु-कणाच्या बाष्पाचे अनंत लोळ निघत आहेत कीं काय असा भास होतो !

कित्येक विचित्र जिज्ञासूंस या धबधब्याची शोभा तळाशीं कशी दिसत असेल, हें जाणण्याची उत्कंठा उत्पन्न होऊन क्यान-डाच्या बाजूनें ते साठसत्तर फूट उंचीच्या शिड्यांवरून खालीं उतरतात, आणि कांठाकाठानें कांहीं अंतर क्रमून ज्या ठिकाणीं धबधबा पडत असतो त्या ठिकाणीं येऊन ठेपतात. या ठिकाणीं उभें राहून वर पाहणारांच्या अंगीं असामान्य धैर्य असलें तरच त्यांचा निभाव लागतो. कित्येकजण घेरी येऊन पडतात, व तेथूनच परत निघून जातात ! तथापि ज्यांचें धैर्य दगडासारखें असतें ते जिवावर उदार होऊन आपली उत्कट जिज्ञासा परिपूर्ण करण्या-साठीं आपले जीव आपल्या वाटाड्यांच्या हवालीं करतात, आणि ते नेतील तिकडे जाण्यास सिद्ध होतात. हे वाटाडे तेथले कोळी

असतात. त्यांना नित्यसहवासामुळें या धबधब्याच्या कांहीं भागांत होडी ढकलण्याची बिलकुल भीति वाटत नाहीं ! ते आपल्या उतारूंस होडींत बसवून घेऊन, थोड्या वेळांत धबधब्याच्या मार्गे घेऊन जातात आणि वर ज्या वायुविवरांचा उल्लेख केला आहे त्यांत त्यांस नेऊन उतरतात. या ठिकाणीं वारा नसल्यामुळें श्वासोच्छ्वास करण्याची मुष्कील पडते, व कांहीं कारणामुळें हवेंतील वारा एकदम बंद पडला, तर कित्येक प्रवाशांचे जीव गुदमरून जाऊन त्यांवर तेथल्या तेथें देह ठेवण्याची पाळी येते ! अशा ठिकाणीं उभें राहून पुढें पडणाऱ्या प्रचंड वारिप्रपाताकडे पहात असतां व कर्णरंध्रास भेदून जाणारा वारिनिर्घोष ऐकत असतां मनाची जी स्थिति होत असेल तिची वाचकांनींच कल्पना करावी ! अशा ठिकाणाहून जे सुरक्षितपणें परत येत असतील त्यांस मृत्युमुखांतून बाहेर पडल्यासारखें होऊन, आपला पुनर्जन्म झाला, असें वाटत असेल यांत कांहीं शंका नाहीं !

गोपाळ गणेश आगरकर.

---

## ३०. आर्यांच्या विद्या.

आपणांस माहीत आहे कीं, आर्यलोक चवदा अगर अठरा विद्या आणि चौसष्ट कला मानितात. चार वेद, सहा वेदांगें आणि मीमांसा, न्याय, इतिहास आणि पुराणें या आर्यांच्या चवदा विद्या होत. यांतच आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद आणि अर्थशास्त्र यांचा समावेश केल्यास, अठरा विद्या होतात. अठरा विद्या मानण्याची वहिवाट बऱ्याचशा ग्रंथांत दिसत नाहीं. याचें कारण ६४ कलांतच

आयुर्वेद, गांधर्ववेद, वगैरेंचा अंतर्भाव झालेला आहे हें होय. या विद्यांपैकीं चार वेद आपणांस माहीतच आहेत. मनुष्याच्या शरीरास जशी हातपाय इत्यादि अंगांची अपेक्षा आहे, त्याचप्रमाणें वेदासही अंगांची अपेक्षा आहे. अंगांवांचून वेदाचा अर्थ वगैरे कळणार नाहीं. हीं अंगें सहा आहेत. तीं शिक्षा, कल्प, निरुक्त, व्याकरण, छन्द आणि ज्योतिष हीं होत. वेदांतील वर्णांचे उच्चार बरोबर झाले पाहिजेत, त्यांतील स्वरांची वगैरे चांगली माहिती झाली पाहिजे, यासाठीं शिक्षा हा ग्रंथ आहे. हल्लीं प्रचारांत असलेली शिक्षा पाणिनीनें केलेली आहे. तथापि ज्या ज्या शाखेस जें जें प्रातिशाख्य आहे तें तें त्या शाखेची शिक्षा होय, असें सांगितलेलें आहे. वेदांत ज्या यज्ञयागादिक अगर स्नानसंध्यादि क्रिया सांगितल्या आहेत त्या कोणत्या प्रकारानें कराव्या हें ज्या ग्रन्थांत सांगितलें आहे त्यास कल्प म्हणतात. कल्प हींच गृह्यसूत्रें होत. गृह्यसूत्रें हीं प्रत्येक शाखेस निरनिराळीं आहेत. वेदांतील शब्दांची व्युत्पत्ति कळावी ह्यासाठीं निरुक्त हा ग्रन्थ यास्कांनीं केलेला आहे. व्याकरणें प्राचीन व अर्वाचीन मिळून अनेक आहेत. तथापि वैदिक व्याकरणाचा विचार पाणिनीसारखा कोणींही केलेला नाहीं. म्हणून पाणिनीच्याच व्याकरणास वेदांग असें म्हणतात. वेदांतील ऋचा हीं पद्यें आहेत. त्यांचीं वृत्तें कळण्याकरितां छंदःशास्त्र पिंगलनागानें केलें आहे. वेदांत सांगितलेलीं कर्में करण्याचा काल बरोबर रीतीनें समजावा यासाठीं ज्योतिषशास्त्र आहे.

याप्रमाणें मीं आपणांस संक्षेपतः वेदांगांची माहिती सांगितली. आतां इतर विद्यांकडे वळूं. मीमांसा दोन प्रकारची आहे. एक

पूर्वमीमांसा व दुसरी उत्तरमीमांसा. वेदांतील अगर त्यावरूनच झालेल्या धर्मशास्त्रांतील वचनांची व्यवस्था कोणत्या प्रकारानें करावयाची हें समजून देण्याकरितां जैमिनीनें मीमांसाशास्त्र केलें. आपणांस धर्मशास्त्रांत आपाततः कोठें कोठें विरोध दिसतात ते मीमांसा न समजल्यामुळेंच होत. ज्या तत्त्वांपासून या प्रचंड ब्रह्मांडाची उत्पत्ति, स्थिति आणि नाश हीं होतात, त्या तत्त्वांचें ज्ञान करून देण्यासाठीं व्यासांनीं उत्तरमीमांसा केली आहे. या शास्त्रांत प्राचीन आर्यलोक फार पुढें गेले होते. आज जो पृथ्वीवर एकंदर हिंदुधर्म गाजत आहे त्याचें कारण ही उत्तरमीमांसाच होय. यालाच वेदांतदर्शन असें म्हणतात. सांख्य आणि योग हीं या शास्त्राचींच अंगें होत. म्हणूनच त्यांचा निराळा निर्देश केलेला नाहीं. न्यायशास्त्र म्हणजे प्रमाणशास्त्र होय. याचे दोन भेद आहेत: एक वैशेषिक व दुसरा न्याय. वैषेशिकशास्त्र कणादऋषीनें व न्यायशास्त्र गौतमानें केलेलें आहे. पहिल्यांत सात पदार्थ मानिले आहेत व दुसऱ्यांत सोळा पदार्थ मानिले आहेत. पदार्थ म्हणजे मुख्य तत्त्वें होत. पूर्वींच्या राजांचीं जीं चरित्रें लिहून ठेविलीं आहेत, त्यांस इतिहास म्हणण्याची चाल आहे. पण पूर्वींचा इतिहास शब्दाचा अर्थ पूर्वीं घडलेल्या कथा असा होत असे. कथा लिहिण्याची चाल वैदिककालापासूनची आहे. ब्राह्मणादि ग्रन्थांत अशा प्रकारच्या कथा पुष्कळ आहेत. ‘हरिश्चन्द्रो ह वै ऐक्ष्वाको राजा बभूव’ इत्यादि कथा प्रसिद्ध आहेत. आमचें महाभारत व रामायण हे इतिहासच होत. ईश्वरापासून क्रमानें सृष्टीची उत्पत्ति कशी झाली, तिचा लय कसा होतो, सूर्यचंद्रादि वंशांत कोणकोणते राजे झाले व त्यांचें संक्षिप्तपणें काय आचरण

झालें आहे व मन्वन्तरें कोणतीं या पांच गोष्टी मुख्यपणें ज्यांत वर्णन केल्या आहेत त्यांस पुराणें म्हणतात. हीं मुख्य अठरा आहेत. त्यांचीं नांवें व ग्रन्थसंख्या कूर्मपुराण, श्रीमद्भागवत इत्यादि ग्रंथांत सांगितलीं आहेत.

श्रीसरस्वतीमांदिर, वर्ष पहिलें.

---

## ३१. कुंजपुऱ्यांतील दसरा.

आश्विन शुद्ध १० शके १६८२ तारीख २० आक्टोबर सन १७६०, या रोजींचा दसरा मराठ्यांच्या इतिहासांत चिरस्मरणीय राहील. मराठ्यांची सत्ता या वेळीं परमोच्च बिंदूस पोंचली होती. हिंदुस्तानचें सार्वभौमत्व या वेळेस त्यांच्या पायीं लोटांगण घालीत होतें. हिंदुस्तानच्या सार्वभौमत्वाचें मानलेलें केंद्र दिल्ली हें या वेळीं त्यांच्या हस्तगत होतें. दिल्लीचा बादशहा जरी त्यांच्या कबजांत नव्हता तरी शाहाजादा होता. कन्याकुमारीपासून अटकेपर्यंत सर्व प्रांतांवर प्रत्यक्ष किंवा परंपरेनें त्यांचा हुकूम सार्वभौमाप्रमाणें चालत होता. सर्वांत मुख्य गोष्ट ही कीं, सार्वभौमसत्तेचा खरा पाया म्हणजे सर्व बाजूंनीं तयार व जय्यत सैन्य आणि सत्ताधारी लोकांची एकजूट या गोष्टी या वेळेस त्यांना अनुकूल होत्या. कुंजपुऱ्यास या दसऱ्याच्या दिवशीं जेवढें व ज्याप्रकारचें सैन्य सीमोल्लंघनास हजर होतें तेवढें व तसें सैन्य मराठेशाहींत मागें किंवा पुढें कधींच दिसलें नाहीं. कुंजपुऱ्याच्या बाहेर पेशव्यांच्या पडावापासून पुढें मैदानांत सायंकाळच्या चार वाजतां हें अवाढव्य सैन्य चार रांगांनीं उभें राहिलें, तें दोन कोसपर्यंत

उभें होतें. दसऱ्याचा दिवस म्हणजे मुख्यतः फौजेच्या सणाचा दिवस. त्यांत फौजेंतील लोकांस या वेळीं मुबलक लूट मिळाली होती. यामुळें सर्व शिपायांनीं व स्वारांनीं व सर्व हुद्देदारांनीं आपापलीं हत्यारें स्वच्छ व दुरुस्त करून व सामान उत्तम व पुरें करून चांगला पोषाक केला होता, व निरनिराळ्या सरदारांचीं सैन्यें निरनिराळ्या थाटानें आपल्या संपूर्ण लवाजम्यानिशीं सज्ज उभीं होतीं. या वेळीं सर्व सरदार पेशव्यांच्या तंबूवर जमा होऊन हत्तीवर बसले व सीमोल्लंघनास निघाले. त्या वेळच्या स्वारीच्या थाटाचें वर्णन काय करावें ? श्रीमंत विश्वासरावांचा हत्ती सर्वांत पुढें चालत होता. तो नखशिखान्त चांदीसोन्याच्या अलंकारांनीं शृंगारलेला असून त्याजवर भरजरी झूल व सुवर्णाची अंबारी होती. त्या चित्रविचित्र रंगवलेल्या सोंडेच्या उंच हत्तीवर श्रीमंत विश्वासरावांसारखा मदनमनोहर ऐन विशीच्या आंतला राजपुत्र मोतीं, हिरे, पाच, माणिक इत्यादि रत्नांच्या अनेक अलंकारांनीं मंडित व राजवैभवानें दीप्त असा विराजमान झाला होता व त्यांच्यामागें त्यांचाच समवयस्क, समसौंदर्य, समवैभव तरुण राजबिंडा, गौरवर्णाचा, मराठी पागोटें घातलेला, मराठा सरदार जनकोजी बाबा अनेक अलंकारांनीं विभूषित होऊन बसलेला होता. त्याच्या थोडेंसें मागें डाव्या बाजूला दुसऱ्या उंच हत्तीवर रुप्याच्या हौद्यांत भाऊसाहेब व बळवंतराव साध्या पोषाकानें व जुजबी अलंकारांनीं युक्त असे बसले होते. त्यांच्या मागच्या दोन हत्तींवर दमाजी गायकवाड व सटवाजी जाधव, मल्हारराव होळकर व विठ्ठल शिवदेव आपापल्या वैभवानिशी होते. त्यांच्या मागें दोन

हत्तींवर यशवंतराव पवार व तुकोजी शिंदे, व समशेरबहाद्दर व महादजी शिंदे होते. याप्रमाणेंच दुसरे मराठे, ब्राह्मण, मुसलमान सरदार व मानकरी व जाट व रजपूत राजांकडील वकील हत्तींवर स्वार झाले असून तो सुमोरें पन्नास हत्तींचा तांडा सारखा मिसलीनें झुलत चालला होता. याप्रमाणें स्वारी चालली ती प्रत्येक फौजेपाशीं थबकत व मुजरे घेत चालली. निशाणापाशीं स्वारी आली कीं, शिंगें, तुताऱ्या वाजून दशदिशा आवाजांनीं भरून जात. प्रत्येक निशाणापाशीं फौजेचे हुद्देदार घोड्यांवर होते, ते विश्वासरावांस, भाऊसाहेबांस व सरदारांस मुजरे करीत तेव्हां " मुजरेपर निगा रखो " म्हणोन घोसदार आवाजानें सोन्याचांदीचे भालदार ललकारत; तेव्हां पाहणारांच्या व ऐकणारांच्या अंगावर आनंदाचे रोमांच उभे राहात. प्रथम लहान लहान सरदारांच्या फौजा असून पुढें हजारिये होते. नंतर डाव्या बाजूस यशवंतराव पवार ( ३००० ), समशेरबहाद्दर ( ३००० ), मल्हारराव होळकर ( ५००० ) व जनकोजी शिंदे ( १०००० ) याप्रमाणें सर्वांचा मिळून एकजात २१००० घोडा उभा असून शिवाय प्रत्येकाच्या फौजेंतील जुंबरेदार, बाणांच्या कैच्यावाले, तोफा व शृंगारलेले हत्ती जागजागीं मिसलीनें उभे होते. त्यांच्या सर्वांच्या-पुढे प्रत्येकाचें भरजरी निशाण व भगवें निशाण गुंडाळलेलें हातांत घेऊन स्वार उभे होते. उजव्या बाजूस विठ्ठल शिवदेव ( ३००० ), दमाजी गायकवाड ( ५००० ) व हुजरात खास विश्वासराव ( १०००० ) व पथकें ( १०००० ) याप्रमाणें २८००० स्वार अनेकरंगी पागोट्यांचे, खांद्यावर वासंडा व कमरेस तलवार, अशा

हत्यारांचे उभे होते. याप्रमाणें तो ५०।६० हजार घोडेस्वारांचा सेना-समुद्र पाहून प्रत्येकाच्या हृदयांत आनंद व हिम्मत यांचा उमाळा येत होता. यापुढें अंतर टाकून दोन्ही बाजूंला दोन तुकड्यांनीं इब्राहिमखानाची कवायत शिकविलेली फौज व तोफखाना उभा होता. एकंदर ९००० पायदळ फौज असून २००० घोडेस्वार होते व त्यांच्या दहा पलटणी होत्या. म्हणजे प्रत्येक पलटणींत ९०० पायदळ व २०० स्वार असून सहा सहा तोफा होत्या. मराठ्यांच्या फौजेंत पूर्वी पायदळ फौज थोडी असे. पायदळ फौजेचें खरें महत्त्व शिवाजीमहाराजांस समजलें होतें. त्यांच्यामागें पायदळ फौज मराठ्यांनीं फारशी ठेविली नाहीं. त्यांस लांब लांब भराऱ्या माराव्या लागत, यामुळें बहुधा शिलेदारी फौज ठेवण्याचा संप्रदाय होता. यानंतर कवायती पलटणें प्रथम सदाशिवरावभाऊंनीं ठेविलीं व त्यांचा त्यांस यापूर्वी चांगला उपयोग झाला होता. पानपतावरही त्यांनीं चांगलें काम केलें हें महादजीस ठाऊक झालें, यामुळें भाऊसाहेबांनंतर महादजी शिंद्यांनीं तोच कित्ता गिरविला, व पायदळ पलटणींच्या जोरावर त्यांनीं हिंदुस्तानचें आधिपत्य पुनः मिळविलें. असो; इब्राहिमखानाच्या तोफांसमोर विश्वास-रावांचा हत्ती येतांच एकदम साठी तोफा दणदिशीं सुटल्या! तेव्हां हत्ती जरा मागेंच हटले. इब्राहिमखान स्वारींत नसून घोड्यावर आपल्या निशाणापाशीं उभा होता. त्यानें विश्वासरावांस इंग्रजी रिवाजाप्रमाणें कानापुढें हात ठेवून सलाम केला; तो त्यांनीं मोठ्या आदरानें घेतला. पलटणी ओलांडून स्वारी शमीपूजनाच्या जागीं आली. तेव्हां सर्व सरदार हत्तींवरून खालीं उतरले व इब्राहिम-

खानासह, कनाती लावून पूजनाची जागा निराळी केली होती, तिच्यांत शिरले. विश्वासरावांनीं शमीपूजन यथाविधि केल्यावर सर्वांनीं शमीचें सोनें लुटलें, व परस्परांस आनंदानें दिलें. या वेळीं अस्तमान झाला. नंतर आलेल्या थाटानें स्वारी परत फिरली. तेव्हां शेंकडों मशाली मैदानावर पेटलेल्या होत्या. प्रत्येक फौजेनें आपापल्या मशालदारांकडून मशाली पेटवून रस्त्याच्या दुतर्फा धरल्या होत्या. ठिकठिकाणीं लोक निशाणांशीं चंद्रज्योति लावीत होते. याप्रमाणें स्वारी पूर्ववत् पण जलदी परत आली. तेव्हां श्रीमंतांच्या तंबूसमोरील मंडपांत दरबार भरला. सर्वांनीं विश्वासरावांस नजरा केल्या व त्यांनीं सरदारांस खडी ताजीम देऊन व इतरांस बसून नमस्कार किंवा रामराम केले. तेव्हां दरबार भालदारांच्या ललकाऱ्यांनीं दुमदुमून गेला. शेवटीं विडे, हार, तुरे, अत्तर व गुलाब दिले जाऊन दरबार विसर्जन झाला.

चिंतामण विनायक वैद्य.

---

## ३२. लूथरचा काळ आणि सध्यांचा काळ.

या देशांत सुधारणेचें बीं रुजविण्याची जी खटपट चालली आहे ती व्हावी तशी फलद्रूप होत नाहीं, असें कांहीं गोष्टींवरून कधीं कधीं आपल्या मनांत येऊं लागतें. तेव्हां ही जी आपल्या मनाची कधीं कधीं निराशेकडे प्रवृत्ति होते, तिच्या यथायोग्यतेविषयीं दोन शब्द बोलण्याचें आज माझे मनांत आहे, व तें करण्यास अन्य ठिकाणीं अन्य काळीं सुधारणेसंबंधानें जे प्रयत्न झाले ते व आपले प्रयत्न, त्यांची व आपली स्थिति वगैरे गोष्टींची जर आपण तुलना केली, तर

आपल्या प्रयत्नांच्या व सिद्धीच्या बरेवाईटपणाबद्दल आपणांस कांहींशी अटकळ करतां येईल. असा अन्य ठिकाणचा प्रसंग म्हटला म्हणजे ‘ रेफर्मेशन ’ या नांवानें प्रसिद्ध अशी जी युरोपखंडांत धर्मक्रांति झाली, ती होय. ह्या धर्मक्रांतीच्या आरंभास आज चारपांचशें वर्षें होऊन गेलीं आहेत व आपल्या इकडील सुधारणेच्या प्रयत्नास सुमारें पन्नाससाठ वर्षें झालीं आहेत. तेव्हां चारपांचशें वर्षांपूर्वीची पश्चिम युरोपची स्थिति व आपली सध्यांची स्थिति यांची आपणांस तुलना करून पाहिली पाहिजे. या काळचा पश्चिम युरोपचा इतिहास पाहिला असतां, त्यांत आपणांस असा एक विशेष भेद दिसून येतो कीं, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, इटली वगैरे देश जरी राष्ट्रत्वानें, राज्यव्यवस्थेनें व भाषेनें परस्परांपासून भिन्न होते तथापि धर्मदृष्टीनें पाहतां त्या सर्वांत ऐक्य होतें. ते सर्व एका धर्माध्यक्षाच्या अमलाखालीं असून त्याची आज्ञा शिरसावंद्य असें मानीत. आपल्या इकडे पाहतांही साठसत्तर वर्षांमागें असाच प्रकार होता. हिंदुस्तानचा विस्तार पश्चिम युरोपपेक्षां कमी नसून भाषा, राष्ट्रत्व वगैरेंनीं प्रांताप्रांतांत जरी भेद असला, तथापि हिमालयाच्या पायथ्यापासून तों कन्याकुमारीच्या टोंकापर्यंत बहुतेक सर्व लोकसमूहास एकच धर्मबंधन होतें व आहे. आम्हांत राष्ट्रैक्य नाहीं म्हणून नेहमीं प्रतिपादन करणारे लोकही आम्हांतील धर्मैक्य कबूल करतात. तात्पर्य, या धर्मैक्यासंबंधानें चारपांचशें वर्षांपूर्वींचा पश्चिम युरोप व सध्यांचा आपला देश यांत बरेंच साम्य आहे, असें दिसून येईल. परंतु या साम्यांतही एक भेद आहे. धर्मसंबंधानें साऱ्या पश्चिम युरोपावर जसें एकट्या पोपचें, म्हणजे धर्मगुरूचें

साम्राज्य होतें, तसें आपल्याकडे धर्मसंबंधानें साऱ्या देशावर ज्याचें एकाधिपत्य आहे असा अधिकारी नाहीं. तेव्हां धर्मैक्याच्या दृष्टीनें जरी त्या वेळचा पश्चिम युरोप व आतांचें हिंदुस्तान यांत साम्य आहे, तथापि त्या धर्माच्या एकछत्रत्वासंबंधानें उभयतांत वैषम्य आहे, असें दिसून येईल. प्राचीन ग्रंथ व त्यांतील मतें यांचें जसें त्या वेळीं सर्वांवर प्राबल्य होतें, त्याप्रमाणेंच येथेंही आहे. ठरीव मतांच्या विरुद्ध जाणारांची जशी त्या वेळीं पाखंड्यांत गणना होत असे तशी आजही होते. धर्मसंरक्षणाचें काम ज्यांच्या हातीं होतें त्या वर्गामध्यें जसे बिशप, मंक, फ्रायर्स वगैरे होते, तसे इकडेही धर्माधिकारी, भिक्षुक, बैरागी, गोसावी वगैरे आहेत. त्या वेळीं जसे लोक अज्ञानी, धर्मभोळे, चेटकें, फलज्योतिष, दैविक चमत्कार वगैरेंवर विश्वास ठेवणारे होते, तसे इकडेही आहेत. या अज्ञानी लोकसमुदायावर जसें त्यावेळच्या धार्मिक वर्गाचें पूर्ण वजन असे, तसें सध्यां येथेंही आहे. ‘ तुमच्या पापांची क्षमा झाली आहे ’ अशा अर्थाचे धर्माधिकाऱ्याच्या सहीशिक्क्याचे चिट्ठे आपणांस मिळाले, म्हणजे आपण पापविमुक्त होऊं असा लोकांचा पूर्ण विश्वास असल्यामुळें, धर्माधिकाऱ्यांनीं पैशाची जरूर लागली असतां ‘ इन्डल्जन्सेस ’ म्हणून पापविमोचनपत्रें विकून धर्मभोळ्या लोकांपासून कसे पैसे उकळले, हें इतिहास-वाचकांस माहीत असेलच. उत्तरोत्तर या धार्मिक वर्गाची निरपेक्ष बुद्धि लयास जाऊन त्यांची लोभबुद्धि जागृत झाली; व कालेंकरून ते इतके संपन्न झाले कीं, त्यांच्या संपत्तीचा लोकांस मत्सर वाटूं लागला. जमिनीपैकीं, सुमारें एक तृतीयांश भाग या धार्मिक वर्गाच्या हातीं होता, इतकें सांगितलें

म्हणजे त्यांच्या स्थितीची सहज कल्पना करितां येईल. आपल्या स्वतःच्या इलाख्यांत या बाबतींत जरी विशेष साम्य दिसण्यास मार्ग नाहीं, तथापि बंगाल व उत्तर हिंदुस्तान यांमध्यें असाच प्रकार आहे. अनायासें घरबसल्या सहज प्राप्त होणाऱ्या संपत्तीच्या मागून अर्थातच स्वकर्तव्यपराङ्मुखता व अनाचार यांस सुरवात झाली. तिकडील मंक जसे ब्रह्मचर्यापासून भ्रष्ट झाले, तसे इकडेही नांवाचे गोसावी असून घरेंदारें करून सुखांत नांदणारे लोक आहेतच. त्या वेळीं तेथें जशी मूर्ति व साधु यांची पूजा जारीनें सुरू होती, तशी आजही येथें आहे. उपवास, व्रतें, यात्रा वगैरेकडे जशी त्यावेळच्या तिकडील लोकांची प्रवृत्ति होती, तशी इकडेही प्रस्तुत आहे. तात्पर्य, चारपांचशें वर्षांपूर्वींची पश्चिम युरोपची स्थिति व आजकालची हिंदुस्तानची स्थिति यांत बरेंच साम्य आहे, असें कोणासही वाटल्यावांचून राहणार नाहीं.

महादेव गोविंद रानडे.

---

## ३३. प्रभातवर्णन.

या सुमारास सभोंवारच्या रानांत आणि तापीच्या कांठच्या वृक्षवल्लींवर रात्रीं विश्राम घेण्याकरितां बसलेले पक्षी किलबिल करूं लागले. या वेळीं सर्वत्र शांत असल्यानें त्यांच्या मंजुळ शब्दांनीं सर्व वनप्रदेश नादावून गेल्यासारखा झाला! हे पक्ष्यांचे शब्द नव्हेत, तर जणूं समस्त वृक्षवल्लींना वाचाच फुटली असून, त्या रात्रीचें गाढ तम आवरून आतां पुनः दैनिक जगद्व्यापार सुरू करण्याचें सामर्थ्य द्या, अशी जगदुत्पादकाची प्रार्थनाच करीत

आहेत, अथवा भूपाळ्या म्हणून त्यास आळवीत आहेत, अशी कल्पना मनांत आली; व या स्तवनानें संतुष्ट होऊन जगच्चैतन्य-रूप सूर्यनारायण आतां लवकरच उदय पावेल अशीं चिन्हें दिसूं लागलीं. आम्हींही एकदां डोकें वर करून तंबूच्या पडद्याच्या फटींतून पाहिलें, तों झुंजुमुंजू झालें आहे असें दिसलें, व यामुळें अंथरुणावर उगीच लोळत पडण्यापेक्षां आतां उठावें, असें मनांत आणून उठलों, व तापीचे कांठीं येऊन सर्व प्रातर्विधि उरकून एका उंच दरडीवर सकाळची शोभा पहात बसलों.

पूर्व दिशा हळुहळू सुप्रकाशित होऊं लागली. उजेड जसजसा वाढत गेला तसतशी पक्ष्यांची किलबिलही अधिकाधिक मोठ्यानें ऐकूं येऊं लागली. आतांपर्यंत ते बसल्या फांदीवरूनच शब्द करीत होते; पण जसजसें अधिकाधिक दिसूं लागलें, त्या मानानें ते त्याच वृक्षाच्या अथवा वल्लीच्या या फांदीवरून त्या फांदीवर असे उडूं बागडूं लागले. आतांपर्यंत वृक्षवनस्पति यांचे जागीं कांहीं काळ्या आकृति मात्र दिसत होत्या; पण आतां प्रभा फांकूं लागली, त्या मानानें हळुहळू मोठ्या वृक्षांच्या फांद्या, त्या फांद्यांस फुटलेल्या लहान फांद्या, त्यांस फुटलेलीं पानें व फुलें इत्यादि अवयव क्रमाक्रमान अधिकाधिक स्पष्ट दिसूं लागले, व सृष्टि जणूं आतांच निर्माण होत आहे कीं काय अशीही कल्पना मनांत आल्यावांचून राहिली नाहीं! एकादा चित्रकार एकाद्या चित्रपटावर आकाश, वृक्ष, वनस्पति, नद्या, पर्वत इत्यादींच्या बाह्यरूपरेषा प्रथम एकदां भराभर रेखाटतो, व मग त्या चित्रांत दाखविलेल्या वस्तूंचे बारीक भाग स्वस्थपणें कोरीत व रंगवीत बसतो,

त्याप्रमाणें रात्रीं पसरलेल्या काळ्या पटावर प्रथमदर्शनीं आसपासचे डोंगर, खडक, नदीचे तट व त्यांवरील उंच उंच व महान् वृक्ष यांच्या अस्पष्ट आकृति प्रथम दिसूं लागल्या, व प्रकाश हळुहळू वाढत गेला, त्या मानानें या प्रत्येकाचे सूक्ष्म भाग व रेखींव कडा क्रमाक्रमानें सुव्यक्त होऊं लागल्या. पूर्वीं सर्वत्र जेथें एकच काळा रंग दिसत होता, त्याचे जागीं आतां कोठें हिरवा, कोठें तांबडा, कोठें भगवा, कोठें पिंवळा असे निरानिराळे रंग, त्या प्रत्येकाच्या पोटच्या व प्रत्येकाच्या दुसऱ्याशीं संयोग झालेल्या अनेक छटा दिसूं लागल्या ! हे रंग मूळचे त्या पदार्थांचे अंगीं असतात, अथवा सूर्याचे किरणांत गुप्त असून पदार्थांच्या संसर्गानें मात्र प्रगट होतात, हें कांहींच कळेना. एकादा गारोडी आपले समक्ष आंब्याची कोय पुरून अल्प काळांत तिचें झाड करून त्यास आंबे आणून दाखवितो, व एकसारखें आपलें ढोलकें पिटून स्वतःची तारीफ करीत असतो, तेव्हां तो आरंभीं या खेळावर पांघरूण घालून त्याची सर्व क्रिया आपणांस पाहूं व कळूं देत नाहीं, व हा सर्व तमाशा नजरबंदीचा आहे, असें आपण समजतों व म्हणतों; तरी पण त्यामुळें अतिशय चकित होऊन जातों व त्याची प्रशंसा करीत सुटतों. परंतु सृष्ट्युत्पत्तिस्थितिनाशाचा अतिशय मनोरंजक खेळ करणारा गारोडी खेळावर पांघरूण न घालतां त्यांतील सर्व सूक्ष्मासूक्ष्म क्रिया, आरंभापासून आतांपर्यंत, प्रत्यहीं आपल्या समक्ष करीत असतो; इतकेंच नाहीं, तर त्या आपणांस चांगल्या समजाव्या व दिसाव्या, म्हणून आपल्यास बुद्धि व दृष्टि दिली असतांही आपण त्या लक्षपूर्वक पाहात नाहीं. एवढेंच नव्हे, तर तो करणारा आपलें

ढोलकें आपणच वाजवीत सुटत नाहीं, व त्याची प्रशंसा तर राहो, पण नित्य स्मरण करण्यासही आपण कसें चुकतों हे विचार यावेळीं मनांत आले ! गारोड्याच्या खेळांत कोर्याचें झाड त्यानें हातचलाखीनें कसें करून दाखविलें एवढेंच ओळखण्याचें असतें. पण मी पाहात होतों अशा प्रसंगीं या अनंत वृक्षवल्ली, हे अत्युच्च डोंगर, हा अगाध व अस्खलित वाहणारा जलप्रवाह—एकंदरींत ही अगाध सृष्टि—कशी व केव्हां निर्माण झाली, व हीस उत्पन्न करून व्यक्त करणारा कोण, केवढा, कसा, कोठें असेल, व तो कसा प्रतीत होईल, हेच विचार मनांत घोळूं लागले व मनही गोंधळून गेलें.

आणखी पांचदहा मिनिटें अशींच गेलीं. पक्षी आपापल्या चाऱ्याच्या शोधार्थ कांहीं थवेच्या थवे करून, कांहीं एकाकी, कांहीं जोडप्यांनीं, असे उडून जाऊं लागले. प्रातःकाळच्या वाऱ्याच्या झुळकांनीं झाडाच्या खांद्या हाललेल्या दिसत, त्यावरून त्यांत चैतन्य दृग्गोचर झालें किंवा त्यांस जणूं धुगधुगी येऊं लागली, असा भास होई. क्रमाक्रमानें पूर्व दिशेचा रक्तिमा कमी कमी होत जाऊन ती जास्त उजळली. क्षितिजाकडे रक्तवर्ण व विशाळ सूर्यबिंब दिसूं लागलें. आणखी थोड्या वेळानें त्याचाही रक्तिमा व आकार हीं कमी कमी होऊं लागून त्यांत पिंवळेपणा मिसळूं लागला. पिंवळ्या रेशमाच्या धाग्यासारख्या किंवा सुवर्णाच्या बारीक तारांसारख्या अनंत पीतवर्ण किरणरूप तंतूंचें जाळें सृष्टीवर पसरलेलें आहे कीं काय, अथवा रात्रीस सृष्टीस आलेली मलिनता किरणरूप सोन्याच्या तारांच्या कुंचल्यानें कुंचलून काढून टाकून उजळाच दिला जात आहे कीं काय, अथवा सूर्यबिंबापासून निघणारे किरण, हे सूर्यरूप हजाऱ्यां-

तून गळणाऱ्या सुवर्णजलाच्या धारा अथवा चिळकांड्याच उडत असून त्यांनीं तमोरूप मळ धुतला जात आहे कीं काय, असा भास झाला ! सुवर्णाभिषेक झाल्यानंतर सृष्टिदेवी रात्रीं परिधान केलेल्या कृष्णवस्त्राचा त्याग करून पिंवळ्या रंगाचें तकतकीत व झिरझिरीत पातळ नेसल्यासारखी दिसूं लागली; व ती तापीचे पात्रांत प्रतिबिंबित झालेली पाहून जशी कांहीं वेणीफणी करून व पिंवळा शालू नेसून आपलें प्रसन्नमुख या महानदीचा विस्तृत जलौघ हाच कोणी आदर्श—ह्यांत पहात आहे कीं काय, अशी उत्प्रेक्षा मनांत आली !

विष्णु गोविंद चिपळूणकर.

---

## ३४. स्वर्गावतरण.

[ आपल्या शत्रूशीं लढण्याकरितां इंद्रानें एके वेळीं दुष्यन्तराजाची मदत मागितली. त्याप्रमाणें दुष्यंतानें स्वर्गलोकाला जाऊन इंद्राचें साहाय्य केलें. युद्धांत विजय प्राप्त झाल्यामुळें इंद्र फार संतुष्ट झाला. त्यानें मोठ्या प्रसन्नतेनें दुष्यंताचा बहुमान करून त्यास निरोप दिला. पुढें इंद्राच्या रथांत बसून त्याचा सारथी मातलि यासहवर्तमान दुष्यन्त भूलोकाला परत येऊं लागला. त्यावेळीं मार्गांतील प्रेक्षणीय स्थळें व इतर चमत्कार यांच्यासंबंधानें दुष्यन्त व मातलि यांचा संवाद झाला. तो जशाचा तसाच खालीं दिला आहे. ]

**स्थळ**—आकाशमार्ग आणि नंतर हेमकूट पर्वत.

**प्रवेश**—राजा आणि मातलि रथावर बसून आकाशांत चालले आहेत.

**राजा**—मातलि, इंद्रानें आम्हांस नेमून दिलेलें काम आम्हीं

शेवटास नेलें खरें, तरी त्यानें जो इतका मोठा आमचा सत्कार केला, तो पाहिला तर आम्हीं केलेलें साहाय्य त्यापुढें कांहींच नाहीं असें मला वाटतें.

**मातलि**—( हंसून ) आयुष्मन्! दोघांनाही आपापल्या कृत्यांचा असाच असंतोष वाटत आहे. दोघांचीही तृप्ति झाली नाहीं असें माझें मत आहे. प्रथमतः आपण इन्द्रावर उपकार केला. परंतु आपल्या मोठेपणामुळें तो उपकार आपणास केवळ क्षुल्लक वाटतो हें ठीकच आहे. तसेंच आपल्या कृत्यामुळें इंद्रानें संतुष्ट होऊन आपणांस जो मान दिला, तोही द्यावा तितका दिला असें त्याला वाटत नाहीं.

**राजा**—मातलि, असें नको म्हणूं. आम्हांला निरोप देतांना त्यानें जो आमचा सत्कार केला, तो तर मनोरथाच्याही पलीकडचा झाला. कारण संपूर्ण देवगण बसले असतां त्यांसमक्ष त्यानें मला आपल्या अर्धासनावर बसवून घेतलें आणि आपल्या हृदयावरील हरिचंदनानें किंचित् लिप्त झालेली आपल्या गळ्यांतून मंदारपुष्पांची माळ काढिली. इतक्यांत ती पाहून, शेजारीं बसलेला त्याचा पुत्र जयंत, याच्या अंतःकरणामध्यें तिज़विषयीं इच्छा उत्पन्न झाली. परंतु इंद्रानें तें जाणून, किंचित् हास्यवदनानें त्याजकडे पाहिलें, आणि ती माळ उचलून माझ्या गळ्यांत घातली!

**मातलि**—आपणांस देवेन्द्राकडून मिळण्याला अयोग्य असा कोणता बरें पदार्थ आहे! पहा बरें, पूर्वकाळीं नारसिंहाच्या नखांपासून दैत्यांचा संहार झाला होता, तसाच आतां आपल्या तीक्ष्ण बाणांपासूनही झाला. सारांश, देवांचा सखा जो इंद्र,

त्याचा स्वर्गलोक, दैत्यांच्या त्रासापासून आपण दोघांनींच काय तो मुक्त केला आहे.

**राजा**—तथापि एथेंही इंद्राच्याच मोठेपणाची स्तुति करणें योग्य आहे. कारण मोठमोठ्या कार्यांमध्येंही लहान लहान सेवकांना जी सिद्धि प्राप्त होते, ती केवळ यजमानाच्या मोठेपणामुळेंच होत असते, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. तसें नसेल तर पहा, सहस्रकिरण जो सूर्य, त्यानें जर अरुणाला आपल्या रथाच्या धुरेवर स्थल दिलें नसतें, तर अंधकाराचा नाश करण्याची त्याची काय बरें प्राज्ञा झाली असती ?

**मातलि**—तसेंच हें आहे खरें. ( अंमळ पुढें रथ चालवून ) आयुष्मन्, आपल्या यशाचें वैभव स्वर्गाच्या शिखरासही जाऊन पोहोंचलें आहे. इकडे पहावें. आपल्या चरित्राचें नीट चिंतन करून गायनास योग्य अशा छंदांनीं हे सुरगण त्याची सार्थ पद्-रचना करीत आहेत आणि देवांगनांनीं आपापलीं शरीरें सुशोभित करण्याकरितां जे रंग आणले होते, त्यांतून राहिलेल्या रंगानें, कल्पवृक्षांच्या पत्रांवर ते ती पदरचना लिहून ठेवीत आहेत.

**राजा**—मातलि, काल मी स्वर्गलोकास चढलों खरा. परंतु दैत्यांना मारण्याच्या उत्सुकतेमुळें, हा प्रदेश मीं नीट लक्ष लावून पाहिला नाहीं; याकरितां आपण वायूच्या कोणत्या मार्गामध्यें आहों सांग बरें ?

**मातलि**—गगनमण्डळास भूषण जी आकाशगंगा, जी स्वर्ग, मृत्यु, पाताल या तिहीं लोकांस जाऊन पोहोंचली आहे, अशा त्या आकाशगंगेला ज्या वायूपासून प्रवाह मिळतो, आणि जो सर्व

तारागणांस भ्रमण देतो, आणि ज्याच्या योगानें प्रकाशकिरण सर्वत्र पसरतात, आणि जो वामनावतारीं विष्णूच्या दुसऱ्या पावलानें पवित्र झालेला आहे त्या परिवहवायूचा हा मार्ग आहे, असें म्हणतात.

राजा--मातलि, यामुळेंच माझा अंतरात्मा सबाह्यांतर प्रसन्न दिसतो. ( रथाच्या चाकांकडे पाहून ) आतां आम्हीं मेघमार्गांत उतरलों.

मातलि—कसें बरें समजलें ?

राजा--हे पहा चातकपक्ष्यांचे थवेच्या थवे, उदकाच्या कणांचें प्राशन करण्याकरितां पर्वतांच्या खांचांतून बाहेर पडत आहेत, झकाझक विजा चमकत असल्यामुळें त्यांच्या प्रकाशानें आपले घोडे चकाकत आहेत; तसेंच आपल्या रथाच्या चक्रांचे कणे तुषारांनीं ओले झाले आहेत. यावरून स्पष्ट दिसतें कीं, पाण्यानें भरलेले मेघ आपल्यावरून चालले आहेत !

मातलि--आणखी एका क्षणामध्यें आपण आपल्या सत्तेच्या भूमीवर उतराल.

राजा--( खालीं पाहून ) मातलि, आम्ही झपाट्यानें खालीं उतरूं लागल्यामुळें मनुष्यलोक पाहून दृष्टीला मोठें आश्चर्य वाटतें. हें पहा, एकाएकीं पर्वत उंचच उंच वाढल्यासारखे दिसून सभोंवतालची भूमि खोल गेल्यासारखी दिसते ! इतकावेळपर्यंत पाल्यामध्यें अगदीं झांकून गेलेले वृक्ष, आतां त्यांच्या फांद्या वेगळाल्या दिसून, मोकळे मोकळे स्पष्ट दिसत आहेत. नद्यांच्या अरुंद अरुंद भागांचें पाणी न दिसल्यामुळें त्या तुटक तुटक दिसत, परंतु

आतां त्या जोडल्यासारख्या दिसूं लागल्या. सारांश, हें भुवन कोणी तरी उचलून वरती आम्हांकडे फेंकून देत आहे असा मला भास होतो !

**मातलि**—आपण म्हणतां तें बरोबर आहे. ( मोठ्या सन्मानानें पाहून ) अहाहा ! पृथ्वी तरी किती गंभीर आणि सुंदर दिसते !

**राजा**—मातलि, हा कोणता बरें पर्वत? ह्याचें एक टोंक पूर्वसमुद्रामध्यें बुडालेलें आहे, आणि दुसरें पश्चिमसमुद्रामध्यें बुडालेलें आहे आणि अस्तमानकाळच्या मेघाप्रमाणें यावरून सुवर्णरसाचे प्रवाह चालले आहेत.

**मातलि**—आयुष्मन् ! हेमकूटनामा पर्वत तो हाच काय बरें ? या ठिकाणीं कुबेराचे किंपुरुष नामक सेवक राहात असतात. हें ऋषींच्या तपाच्या सिद्धीचें महत् क्षेत्र आहे. एथें स्वयंभू जो ब्रह्मदेव त्याच्या मरीचिनामक पुत्रापासून उत्पन्न झालेला मारीचप्रजापति, संपूर्ण देवदानवांचा पिता, आपल्या पत्नीसहवर्तमान तपस्या करीत असतो.

**राजा**—( आदरपूर्वक ) तर मग पुण्यप्राप्तीची वेळ चुकवितां नये. भगवान् ऋषीला प्रदक्षिणा करून जावें अशी माझी इच्छा आहे.

**मातलि**—ही तर पहिली गोष्ट. ( रथ उतरतो. )

**राजा**—( आश्चर्यानें ) अरे वा ! तुझा रथ केव्हां उतरला हें लक्ष्यांतसुद्धां आलें नाहीं ! कारण चक्रांच्या कण्यापासून कांहीं मोठा शब्द उत्पन्न होत नाहीं, धुळीचे लोटही कोठें उठलेले दिसत नाहींत, आणि जमिनीला लागल्यावांचून तो चालत आहे, ह्यामुळें त्याच्या गतीपासून धक्केही कोठें बसत नाहींत !

**मातलि**--एवढाच काय तो आपल्यामध्यें आणि इंद्रामध्यें भेद आहे.

**राजा**—मातलि, मारीचमुनींचा आश्रम कोणत्या प्रदेशीं आहे बरें ?

**मातलि**—( हातानें दाखवून ) हा पहा तो मुनि ! वारुळामध्यें त्याचें अर्धें अंग गढून गेलें आहे, आणि त्याच्या हृदयावर यज्ञोपवीताप्रमाणें सर्पाची त्वचा पसरलेली आहे ! गळ्यासभोंवतीं पाहिलें तर जीर्ण झालेल्या लतांच्या तंतूंचें वेष्टन पडून, त्या त्यास अतिशय पीडा देत आहेत, आणि जटांचें पेंडाळें तर भुजांवर पसरलेलें असून त्यांमध्यें पक्षांनीं आपलीं घरटीं केलेलीं आहेत ! याप्रमाणें हा सूर्यबिंबाकडे दृष्टि लावून वृक्षाच्या बुडख्याप्रमाणें कसा निश्चल बसून राहिला आहे पहावें.

**राजा**—हे खडतर तपस्व्या ! तुला नमस्कार असो.

**मातलि**—( घोड्याचे दोर ओढून धरतो ) महाराज, हे आपण मारीच ऋषीच्या आश्रमास येऊन पोंचलों ! हे पहा येथें अदितीनें लाविलेले मंदारवृक्ष !

**राजा**—स्वर्गापेक्षां हें अधिक आनंदाचें स्थल होय. एथें मला अमृताच्या डोहांत बुडी मारल्याप्रमाणें सुख वाटतें.

**मातलि**—( रथ थांबवून ) आयुष्मन् ! उतरावें.

**राजा**—( उतरून ) मातलि, तुझें कसें काय आतां ?

**मातलि**--मी आपला रथ बद्ध करून ठेविला आहे; मीही खालीं उतरतों. (तसें करून) आयुष्मन्, येथें येऊन ऋषींच्या तपोवनांचे प्रदेश पहावे.

राजा---खरोखरच हें स्थान पाहून मला मोठा विस्मय वाटतो. कारण इष्ट मनोरथ पूर्ण करणाऱ्या पवित्र कल्पवृक्षाचें हें वन, परंतु यामध्यें यांनीं केवळ वायुभक्षण करूनच प्राणरक्षण चालविलें आहे ! सुवर्णासारख्या पद्मकमलांच्या रेणूंनीं चकाकत असलेलें उदक, फक्त स्नानसंध्यादि कृत्यांकडेसच यांनीं लाविलें आहे! यांचीं राहण्याचीं घरें रत्नजाडित पाषाणांचीं बांधलेलीं असतां अशा स्थळीं हे केवळ ईश्वरी ध्यानामध्येंच गढून गेलेले आहेत ! हें तर काय, पण अनेक देवांगना यांच्या संनिध असतां इंद्रियदमनामध्येंच हे काळ घालवीत आहेत ! सारांश, इतर मुनि तपश्चर्या करून ज्या फलाची इच्छा धरितात, तेंच संनिध असतांही यांची पुनः तपश्चर्याच चालली आहे !

परशुरामपंत गोडबोले.

---

## ३५. महाराणी लक्ष्मीबाई.

महाराष्ट्रामध्यें साताऱ्याजवळ श्रीकृष्णातीरीं वांई नामक एक क्षेत्र आहे. तेथें कृष्णराव तांबे ह्या नांवाचे एक कऱ्हाडे ब्राह्मण रहात असत. हे पेशवाईमध्यें मामलती करीत असत. त्यांना बळवंतराव या नांवाचे एक चिरंजीव होते. ते चांगले शूर असल्यामुळें त्यांच्यावर महाराष्ट्रप्रभु श्रीमंत पेशवे सरकार यांची कृपा असून त्यांस त्यांनीं हुजूर फौजेवरील सरदाराची जागा दिली होती. त्यांना मोरोपंत व सदाशिवराव असे दोन पुत्र होते. सदाशिवराव बिठ्ठाओर येथें वारले. मोरोपंत आपल्या वडिलांजवळ पुण्यास होते; व त्यांच्यावर श्रीमंत दुसरे बाजीरावसाहेब यांचे बंधु चिमाजी

आप्पा यांची प्रसन्न मर्जी होती. सन १८१८ सालीं श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे ह्यांनीं बऱ्हाणपुरापलीकडे बोरी मुक्कामीं मालकम साहेबाजवळ सर्व राज्याची सोडचिट्ठी देऊन दरसाल आठ लक्ष रुपये पेनशन घेण्याचें मान्य केलें, व राहिलेलें आयुष्य ब्रह्मावर्त येथें घालविण्याचा निश्चय केला, त्यावेळीं आप्पासाहेब पेशवे यांची स्वारी दक्षिण प्रांतींच होती. पुण्याचे रेसिडेंट मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन ह्यांनीं त्यांस सांगितलें कीं, 'दहावीस लक्षांचा मुलूख तुम्हांस देतों, तुम्ही पुण्याचें संस्थान संभाळून रहावें.' तें चिमाजी आप्पांनीं ऐकिलें नाहीं, म्हणून त्यांस वसईस नेऊन ठेविलें. परंतु पुढें त्यांनीं असें बोलणें लावलें कीं, 'आह्मी काशीस जातों.' त्यावरून इंग्रज सरकारांनीं कांहीं नेमणूक ठरवून त्यांना काशी येथें पाठविण्याचें कबूल केलें. चिमाजी आप्पा फार साधे पुरुष असल्यामुळें त्यांनीं नाममात्र मिळणाऱ्या पेशवाईच्या गादीची आशा सोडून दिली; आणि बाजीरावसाहेबांच्या मागून सुमारें सहा महिन्यांनींच श्रीवाराणशी क्षेत्रीं गमन केलें. त्यांच्याबरोबर जो लवाजमा गेला होता त्यांत वर सांगितलेले मोरोपंत तांबे हेही सहकुटुंब गेले होते. त्यांच्याकडे श्रीमंतांच्या दिवाणगिरीचें काम असून त्यांना तत्प्रीत्यर्थ ५० रुपये दरमहा मिळत असत.

मोरोपंत ह्यांच्या पत्नीचें नांव भागीरथीबाई असें होतें. ती चांगली रूपगुणसंपन्न असल्यामुळें मोरोपंतास संसारामध्यें फार सुख वाटत असे. ह्या नवराबायकोंचें परस्परांवर अतिशय प्रेम होतें. मोरोपंत श्रीमंतांच्या आश्रयास असल्यामुळें त्यांना कोणत्याच गोष्टीची उणीव नव्हती, तथापि ह्या सुशील पत्नीच्या योगानें त्यांच्या

भाग्यशालित्वाला विशेष भर पडली होती. खरोखर त्यांच्या पत्नी-विषयीं जों जों विचार करावा, तों तों—

पत्यनुकूला चतुरा प्रियंवदा या स्वरूपसंपूर्णा ।
सहजस्नेहरसाला कुलवनिता केन तुल्या स्यात् ॥

ह्या कविवचनाची जास्त जास्त प्रतीति येते. असो. ह्या पतिसेवा-तत्पर सौभाग्यवती भागीरथीबाई काशी येथें कार्तिक वद्य १४ संवत् १८९१ ( ता. १९ नोव्हेंबर सन १९३५ ) रोजीं कन्या-रत्न प्रसवल्या. हें आनंदवृत्त श्रवण करून सर्व मंडळीस फार संतोष झाला. तांबे यांच्या शूर कुलामध्यें श्रीकाशीसारख्या पुण्यक्षेत्रीं जन्म पावलेलें कन्यारत्न कोण हें वाचकांस निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. रीतीप्रमाणें ह्या कन्यारत्नाचा जन्मोत्सव होऊन बारशाचे दिवशीं नामकरणाचा मोठा सोहळा झाला. मोठ्या समा-रंभानें ह्या मनोहर कन्येचें मनुबाई असें नांव ठेवण्यांत आलें.

मनुबाईचें सुंदर बाळरूप पाहून कोणाचेंही चित्त हर्षभरित होत असे. त्यावेळीं हीच बालमूर्ति पुढें हिंदुस्तानांत अलौकिक पराक्रम करील अशी कल्पना कोणाच्या स्वप्नींही आली नाहीं ! जन्म-स्थानीं मनुबाईचे ग्रह उत्तम होते. मोरोपंतांनीं काशींतील नामां-कित ज्योतिःशास्त्रज्ञांकडून तिची जन्मपत्रिका तयार करून घेतली होती, तिच्यावरून मात्र ही मुलगी राज्यलक्ष्मीनें अलंकृत होऊन कोणी सुप्रसिद्ध शौर्यशालिनी स्त्री निपजणार असें भविष्य कळून आलें होतें; परंतु तें कोणास खरें वाटणार ?

मनुबाई तीन चार वर्षांच्या झाल्या नाहींत तोंच त्यांच्या मातुश्री परलोकवासी झाल्या. ह्याच समयास मोरोपंतांस काशीवास

सोडून ब्रह्मावर्ती जाऊन राहाणें भाग पडलें. कारण त्यांचे यजमान श्रीमंत आप्पासाहेब कैलासवासी झाल्यामुळें त्यांच्या कुटुंबीय मंडळींस व आश्रित जनांस श्रीमंत बाजीरावसाहेब ह्यांनीं आपल्या नेहमींच्या औदार्यबुद्धीनें आपल्याजवळ आश्रय दिला. ब्रह्मावर्त येथें मोरोपंत हे श्रीमंतांच्या अगदीं सन्निध असत. मनुबाईस बापाचा फार ळळा होता, तशांत दुर्दैवानें मातृवियोग झाल्यामुळें तो विशेष वाढला होता. बालकास आईसारखें दुसरें दैवत नाहीं, त्याचा सर्व सांभाळ मातेच्या हातून जसा उत्तम रीतीनें होईल तसा इतरांच्या हातून कदापि होणार नाहीं. लहानपणीं मुलांची आई गत झाली म्हणजे त्यांचा सर्व भार बापावरच येऊन पडत असतो, त्याप्रमाणें मनुबाईचा सर्व भार मोरोपंतांवर येऊन पडला होता. त्यामुळें त्यांस तिची विशेष काळजी घेणें भाग पडत असे. मुलगी सुस्वरूप व बाळसेदार असून तिचा वास नेहमीं पुरुषवर्गामध्यें असल्यामुळें, श्रीमंतांच्या पदरची सर्व मंडळी तिला मोठ्या प्रेमानें घेत असत. तिचे ते पाणीदार व विशाळ नेत्र आणि गौरवर्ण मुख पाहून प्रत्येकास आनंद वाटत असे, ह्यामुळें ती मनमोहक मुलगी बापाचीच काय पण सर्वांचीच लाडकी होऊन गेली होती. बाजीरावसाहेबांच्या पदरची रामचंद्रपंत सुभेदार, बाबाभट इत्यादि प्रमुख मंडळी ह्या मुलीची चपळ व सतेज वृत्ति पाहून तिला मोठ्या कौतुकानें 'छबेली' म्हणत असत. श्रीमंतांचे दत्तक चिरंजीव नानासाहेब व रावसाहेब हीं मुलेंही ह्या समयीं अगदीं लहान असल्यामुळें त्यांनीं तऱ्हेतऱ्हेचे खेळ खेळावे, व त्यांमध्यें ह्या मुलीनेंही

शिरावें, असा क्रम चालत असे. ह्या बालवृंदाच्या लीला पाहून श्रीमंतांस परमानंद वाटत असे.[१]

नानासाहेब व रावसाहेब यांस विद्याभ्यास शिकविण्याकरितां तत्कालीन पद्धतीप्रमाणें एक शिक्षक ठेविला होता. तो त्यांस मोडी व बालबोध अक्षर शिकवीत असे. त्या वेळीं मनुबाईही त्यांच्या सन्निध असल्यामुळें अनायासेंच तिला साधारण अक्षरओळख झाली होती. नानासाहेब व रावसाहेब हे घोड्यावर बसून फेरफटका करावयास निघाले कीं, मनुबाईही त्यांच्याबरोबर जात असे. नानासाहेब तरवारीचे हात फिरवूं लागले कीं, तिनेंही तरवार फिरवूं लागावें ! नानासाहेब हत्तीवर बसले कीं, तिनेंही हत्तीवर बसावें. एके वेळीं अशी गोष्ट झालेली सांगतात कीं, नानासाहेब हत्तीवर बसले त्या वेळीं मनुबाईही हत्तीवर बसण्याचा हट्ट करूं लागली. श्रीमंतांजवळ एकच हत्ती होता. त्याकारणानें नानासाहेबांस मुलीला घेऊन बसावें असें त्यांनीं सांगितलें, परंतु ते कांहीं केल्या ऐकेनात व मुलगीही हट्ट सोडीना. त्यावेळीं मोरोपंत अतिशय त्रासले, व मनुबाईस म्हणाले, ‘ तुझ्या नशिबीं हत्ती कोठून येणार ? ’ हें ऐकून त्या पाणीदार मुलीनें तेव्हांच उत्तर दिलें, ‘ एक सोडून दहा हत्ती माझ्या नशिबीं आहेत. ’ आणि खरोखर, लौकरच तिचें लग्न

१ राणीसाहेबांच्या बाळपणासंबंधानें त्यांच्या सापत्न मातुश्री चिमाबाईसाहेब यांनीं पुढें लिहिलेली माहिती कळविली आहे:—“ लहानपणीं लग्नाचे पूर्वी बाईस ( राणी लक्ष्मीबाई यांस ) पतंग उडविणें, चक्री खेळणें, मुलींमध्यें राणी बनणें असे खेळ आवडत असत. कांहीं मुलींस नौकर करावें, त्यांनीं कोणतें काम न केल्यास त्यांजला दंड करावा म्हणजे भातुकलींतून कांहीं देऊं नये, वगैरे बाललीला खेळण्याची त्यांस संवय असे. ”

होऊन ती अनेक गजांची स्वामिनी झाली ! असो; सांगावयाचें तात्पर्य हेंच कीं, अशा प्रकारें श्रीमंती सुखामध्यें मनुबाईचें बालपण गेल्यामुळें तिला अनायासें गुण प्राप्त झाले. सदनुकरण हा परीस आहे. त्याचा समागम ज्यास प्राप्त होतो त्याचें सुवर्ण झाल्यावांचून रहात नाहीं. बालपणी बालकांचीं कोमल मनें सर्वस्वीं अनुकरण-प्रिय असल्यामुळें त्या वेळीं त्यांस अनुकरणानें जें वळण मिळतें तेंच त्यांच्या भावी उन्नतीस किंवा अवनतीस कारणीभूत होतें. पेशवेवंशांतील श्रीमंत बाजीरावसाहेबांसारख्या महाराष्ट्रप्रभूंच्या तेजस्वी राजकुमारांचें जिला सान्निध्य व त्यांच्या क्षात्रगुणांचें अनु-करण करण्याची जिला उत्तम संधी मिळाली, ती सरदारघरा-ण्यांतील मनुबाई अद्वितीय क्षात्रतेजाची पुतळी बनावी, हें अगदीं साहजिक व योग्य आहे. ह्याच उदाहरणावरून आधुनिक विद्वान् मंडळीस स्त्रियांस उन्नतीच्या मूलतत्त्वांचें पूर्ण संशोधन करण्यास पुष्कळ जागा सांपडेल ह्यांत शंका नाहीं.

दत्तात्रय बळवंत पारसनीस.

---

## ३६. संस्कृत भाषेचें महत्त्व.

संस्कृत भाषा—जीस गीर्वाण भाषा असेंही म्हणतात, ती—प्राचीन आर्य लोकांची भाषा होय. ही भाषा बोलण्याच्या प्रचारां-तून नाहींशी झाली त्यास सहस्रावधि वर्षें झालीं. तेव्हांपासून त्या भाषेचे अपभ्रंश होऊन झालेल्या ज्या हिंदी, मराठी, गुजराथी वगैरे भाषा, त्या हिंदुस्तानच्या निरनिराळ्या भागांत देशभाषा झाल्या. केवळ शास्त्रीय वगैरे ग्रंथ लिहिण्यास मात्र संस्कृत भाषेचा

उपयोग होऊं लागला. असें झालें असतांही ही भाषा लयास गेली नाहीं. ह्याचें कारण हें कीं, जरी तिचा प्रचार बुडाला तरी तिचा व्यासंग नाहींसा झाला नाहीं. कोणी धर्म समजून घेण्याकरितां, कोणी शास्त्राध्ययन करण्याकरितां, कोणी लोकांत प्रतिष्ठा मिळविण्याकरितां अशा नानाप्रकारच्या निमित्तांनीं लोक तिचा अभ्यास करीत. पुढें मुसलमानी बादशाही झाल्यापासून या भाषेचा लोप होऊं लागला होता. परंतु पुनः एतद्देशीय लोकांचें प्रभुत्व झाल्यावर तिचें उज्जीवन झालें. शेवटीं इंग्रज लोकांचा अंमल चालू झाल्यावर या भाषेचा अभ्यास युरोपांत होऊं लागला, व तेथल्या लोकांनीं या देशांतून संस्कृत ग्रंथ नेऊन छापले, व अजूनही जुन्या ग्रंथांचा शोध करण्याचा तसाच क्रम चालला आहे. म्हणून आतां ह्या भाषेचा लोप होण्याचें भय अगदीं नाहींसें झालें आहे. प्रस्तुतचा विषय इतका मोठा आहे कीं, त्यावर सविस्तर व पुरतेपणीं कोणी लिहिल्यास फारच मोठा ग्रंथ होईल. या विषयावर लिहितांना संस्कृत भाषेचा इतिहास, म्हणजे ही भाषा कोठून उत्पन्न झाली, व केव्हां झाली, कोणत्या देशचे लोक ही भाषा बोलत होते, व अशी चालत असतांना तींत फेरफार वगैरे कोणते झाले, इत्यादि गोष्टींचें विवेचन; तसेंच या भाषेत अनेक शास्त्रांवर जे नानाविध ग्रंथ आहेत, त्यांचें पर्यालोचन, व यांशिवाय आणखी पुष्कळ गोष्टींचा विचार केला पाहिजे. हे जे वर या विषयाचे विभाग सांगितले यांवर सविस्तर लिहिणें हें सामान्य मनुष्याचें काम नव्हे. कां तर व्याकरण, न्याय, ज्योतिष, मीमांसा इत्यादिक अनेक शास्त्रें–जीं इतकीं गहन आहेत कीं–त्यांपैकीं दोहों तिहीं-

मध्येंच पारंगत होण्यास कित्येक वर्षें घालवावीं लागतात, व त्यां-शिवाय अनेक पुराणें, काव्यें, नाटकें, वगैरे या सर्वांत प्रवेश करून त्यांचें विवेचन करावयाचें म्हणजे लहानसान कृत्य नव्हे. असो; संस्कृत भाषा केव्हां उत्पन्न झाली व ती कोणते लोक पहिल्यानें बोलत होते, या गोष्टींचा निर्णय करण्याची हाव धरणें अगदीं व्यर्थ आहे. पहा कीं, शाकुंतल नाटक, रघुवंश वगैरे जीं अर्वाचीन काव्यें, त्यांच्या कर्त्यांचाही निश्चितपणें कांहींच वृत्तांत कळत नाहीं; त्यांहीपेक्षां पाणिन्यादि शास्त्रकार व व्यासादि पुराणांचे कर्ते, यांचा कांहींच पत्ता लागत नाहीं. केवळ त्यांचे अमूल्य ग्रंथ मात्र, ते या जगतीवर वास करीत होते, याविषयींचे दाखले आहेत. तर मग महाभारतासारख्या ग्रंथांस अर्वाचीन म्हणून आपणांस प्राचीन म्हणविणारे असे वेदादि ग्रंथ, ते अमक्या काळीं झाले याचा निर्णय करणें किती दुर्घट आहे! एवंच, संस्कृत भाषेचा उगम समजणें अशक्य आहे.

या पृथ्वीवर प्राचीनकाळीं जीं राष्ट्रें होतीं त्या सर्वांत प्राचीन हिंदुलोक अगोदर अज्ञानावस्थेंतून निवून विचारसंपन्न झाले, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. त्यांनीं विचार करून पहिल्यानें गणित, ज्योतिष, व्याकरण, न्याय वगैरे शास्त्रांवर ग्रंथ केले. इतकेंच नव्हे, तर अशीही अटकळ कोणी करितात कीं, प्राचीनकाळीं युरोपांत ज्ञानसंपन्न झालेले जे ग्रीक व रोमन लोक त्यांस हे संस्कृत ग्रंथ उपलब्ध होऊन नंतर त्यांनीं त्या त्या विषयांवर आपल्या भाषेंत ग्रंथ रचिले. हें सिद्ध करण्याला अशीं प्रमाणें सांगतात कीं, ज्योतिषां-तील बारा राशींचीं नांवें संस्कृत व लातिन भाषांत सारखीं आहेत;

व संख्या लिहिण्याचे अंकही अरबी लोकांनीं प्रथमतः हिंदुस्तानांतून नेऊन त्यांचा युरोपांत प्रसार केला. तसेंच शिकंदर बादशहाचा गुरु जो आरिस्टाटल, त्यानें न्यायशास्त्रावर जो ग्रीक भाषेंत ग्रंथ रचिला आहे, तोही प्रायः संस्कृत ग्रंथांच्या आधारानें केला असावा. यावरून निरनिराळ्या शास्त्रांवर जे ग्रंथ संस्कृतांत लिहिले आहेत त्यांची योग्यता किती आहे हें सहज लक्षांत येईल. संस्कृत भाषेचें पाणिनी ऋषीनें अष्टाध्यायी नांवाचें जें व्याकरण केलें आहे त्यासारखें संपूर्णतेस पावलेलें व्याकरण कोणत्याही भाषेंत नाहीं. एवढी विस्तीर्ण संस्कृत भाषा खरी, परंतु त्यानें आपल्या सूत्रांनीं तीस अगदीं निबद्ध करून टाकलें आहे. त्यानें आपलें अपार चातुर्य व बुद्धि खर्चून आपल्या सांकेतिक भाषेंतील सर्व नियम, अपवाद, प्रत्यपवाद, एकूणएक आपल्या सूत्रांस ग्रथित केले आहेत. पाणिनी मुनीनें संस्कृत भाषेस ही केवढी देणगी व केवढें भूषण अर्पण केलें आहे! तथापि कित्तीएक विद्वानांचें असें मत आहे कीं, भाषा अशी नियमबद्ध केल्यानें तिचा स्वेच्छाप्रचार कुंठित होतो, व व्याकरणाचें जें काम कीं भाषेच्या अनुरोधानें चालावें तें न होतां उलट व्याकरण भाषेवर जबरदस्ती करूं लागतें. हें म्हणणें कांहीं अंशीं खरें आहे; परंतु त्यावरून पाणिनीसारखा व्याकरणकर्ता दोषास पात्र होतो असें नाहीं. संस्कृत भाषेचेच काय, परंतु सर्व भाषांचे सामान्य नियम असतात ते कधींच बदलत नाहींत. बदलणारीं कायतीं नामें, धातु इत्यादिकांचीं कालवशात् भिन्नभिन्न होणारीं जीं विशेषणरूपें तीं मात्र होत. त्यांतून संस्कृताप्रमाणें विस्तीर्ण व विकल्पप्रचुर अशा भाषेस जरी व्याक-

रणानें अगदीं कडेकोट बांध घातला, तरी तिच्या स्वेच्छविहारास पुरूनही उरे इतका अवकाश राहीलच.

हें इतकें वर्णन संस्कृत भाषेस ज्या भूषणांनीं शोभविली आहे त्यांचें झालें. तिच्या अंगच्या सौंदर्याचें वर्णन राहिलेंच आहे. त्या त्या भाषेस कर्णमधुरता, प्रौढत्व, वर्णसुखोच्चरण हीं इतकीं अंगभूत आहेत कीं, ज्यांस ह्या भाषेचा गन्धही नाहीं, त्यांस—फार तर काय अन्यदेशीय लोकांसही—हे गुण मोहून टाकतात, व केवळ श्रवण-मात्रेंकरूनच त्यांस आल्हाद वाटतो. पहा कीं, इंग्रजी भाषेंत शब्दा-वयवांत देखील वर्णांच्या सुखोच्चरणाविषयीं अनास्था असते ( जसें:–Non-payment, Submit, Un-bend ); मग शब्दा-शब्दांत ती असल्यास नवल काय ? संस्कृतांत तर शब्दावयवांत काय पण सगळ्या एकंदर वाक्यांत देखील हा दोष दुःसह होतो. जरकरितां एका शब्दाच्या अंतीं व पुढील शब्दाच्या आरंभीं असे मिळून असवर्ण वर्ण येऊं लागले, तर लागलेच ते दोन्ही सवर्ण होऊन त्यांचें सम्मेलन होतें, मग ज्या भाषेंत असे दोष सहन होतात तिचें कर्णमधुरत्वही कमीच असलें पाहिजे, हें उघड आहे. आणि जर संस्कृत भाषेची वर सांगितलेल्या गोष्टींनीं रूपमनोहरता सिद्धच आहे, तर मग सदर्थ, रस, गांभीर्य इत्यादि अनेक गुणां-चेंही साहित्य झाल्यास ती चित्तरंजन करील, हें काय सांगावें ? अहाहा ! कालिदास, भवभूति, जगन्नाथराय अशा कवीश्वरांच्या रसभावाद्यनेकगुणशालिनी व अक्षय सुखाच्या खाणी अशा ज्या निरुपमा कृति त्यांचा आस्वाद घेऊन हर्षभरानें डोलणाऱ्या अशा रसिकांचें भाग्य काय वर्णावें ? इतर भाषांस असाधारण असा

दुसरा एक गुण संस्कृत भाषेंत आहे तो हा कीं, वक्त्याला आपल्या मनांतील अर्थ ठुमदार थोड्या शब्दांनीं खुबीनें व्यक्त करितां येतो. संस्कृतांत जसे समास आहेत तसे इंग्रजी, फ्रेंच, मराठी वगैरे अर्वाचीन भाषांत तर ते नाहींतच असें म्हटलें तरी चालेल. संस्कृतांत समासांत किती पदें घालावीं याचा नेमच नाहीं. कादंबरी, दशकुमारचरित वगैरे ग्रंथांत दोन दोन तीन तीन ओळी एकच सामासिकपद असतें. म्हणून त्या पदांचें भाषांतर इंग्रजींत किंवा मराठींत करूं लागल्यास मूळापेक्षां चौपट पांचपटही जागा लागते. तसेंच संस्कृतांत शब्दांचा भरणा इतका मोठा आहे कीं, कोणता कितीही सूक्ष्म अर्थ असला तरी तसा व्यक्त करितां येतो,

अलीकडे भाषाशास्त्राकडे पंडित लोकांचें फार लक्ष्य लागलें आहे. या शास्त्राच्या वृद्धीस संस्कृत भाषा फारच कारण झाली आहे. पूर्वीं युरोपांत मुख्य भाषा लातिन व ग्रीक ह्याच काय त्या ठाऊक असत; व त्यांचा आणि चालू देशभाषांचा जो परस्परसंबंध तोही कांहीं थोडा मात्र ठाऊक होता. परंतु सुमारें चाळीस पन्नास वर्षांमागें जेव्हां संस्कृत भाषेचा अभ्यास युरोपांतील पंडित करूं लागले, तेव्हां संस्कृताचें लातिन व ग्रीक भाषांशीं जें सादृश्य आहे तें त्यांस समजलें. लातिन, ग्रीक, जर्मन वगैरे भाषांचेंच जेव्हां ते एकमेकांशीं सादृश्य जमवूं लागले, तेव्हां त्यांस व्यापक नियम फारसे सांपडेनात; परंतु संस्कृत, झेंद या भाषांच्या ज्ञानानें मूळच्या शब्दांचे एका भाषेंतून दुसऱ्या भाषेंत असे जात जात कसे फेरफार

होत गेले ते त्यांस समजून आले; व त्यांचे नियमही समजले. आतां भाषाशास्त्रज्ञांनीं सर्व भाषांचे तीन भाग केले आहेत. ते असे: आरियन भाषा, सेमेतिक भाषा व तुरेनियन भाषा. आरियन या विभागांत संस्कृत, जेंद, ग्रीक, लातिन, जर्मन, इंग्लिश वगैरे भाषा येतात; व या सर्वांत संस्कृत भाषा मुख्य आहे. आरियन हें नांवही आर्य या संस्कृत शब्दापासूनच घेतलें आहे; व त्याचा अर्थ आर्य लोकांची भाषा असा आहे.

कृष्णशास्त्री चिपळूणकर.

---

## ३७. कृष्णशास्त्री चिपळूणकर.

शास्त्रीबोवा अत्यंत बुद्धिमान असून त्यांचें शास्त्राध्ययन जुन्या पद्धतीप्रमाणें झालें होतें. न्याय व अलंकार या शास्त्रांत ते निपुण होते. प्रौढ वयांत त्यांनीं इंग्रजीचा अभ्यास केला. मराठी, संस्कृत व इंग्रजी या तिन्ही भाषांत त्यांनीं प्रवीणता संपादन केली. यांच्या बुद्धीमध्यें सूक्ष्मपणा, विशदपणा व व्यापकता हे धर्म विशेष होते. त्यांची कुशाग्रबुद्धि सर्व विषयांत सारखी चाले व त्यांतील मर्म त्यांस सहज समजे. त्यांचें वाचन फार विस्तृत असून त्यांचा विद्या-व्यासंगही जबरदस्त होता. इंग्रजीमध्यें प्रवेश झाल्याबरोबर त्यांनीं आपल्या बुद्धिबलानें त्या प्रगल्भ भाषेंतील ज्ञानभांडार आपलेंसें करून घेतलें. त्यामुळें त्यांस जो आनंद व लाभ झाला त्याचा अंश तरी मराठी वाचणारांस प्राप्त व्हावा अशा बुद्धीनें त्यांनीं मराठी ग्रंथरचना आरंभिली. यावरून त्यांच्या ग्रंथरचनेचा हेतु किती उदात्त होता हें दिसून येतें. शास्त्रीबोवांचे ग्रंथ प्रायः भाषान्तररूप आहेत. परंतु ते

विद्वान् व मार्मिक भाषाभिज्ञ होते, यामुळें त्यांचीं भाषांतरें मूलग्रंथासारखींच सरस उतरलीं आहेत. इंग्रजी व मराठी या भाषांमध्यें सादृश्य नाहींच असें म्हटलें तरी चालेल. यामुळें पहिलींतून दुसरींत बेमालूम तर्जुमा करणें किती अवघड आहे हें सहज लक्ष्यांत येईल. तरी पण प्रस्तुत पंडिताचा या कामांत फारच मोठा लौकिक आहे. ‘ सॉक्रेतिसाचें चरित्र, ’ ‘ रासेलस्, ’ ‘ अरेबियन नाइट्स्, ’ ‘ अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह ’ या त्यांच्या भाषांतररूप कृति आहेत. पण या इतक्या सुंदर उतरल्या आहेत कीं, इंग्रजीचा ज्यास गंधही नाहीं त्याला देखील त्यांतील रसाचा आस्वाद घेतां येतो. ‘ अर्थशास्त्रपरिभाषा, ’ ‘व्याकरणावरील निबंध’, व इतर कांहीं शास्त्रीय विषयांवरील शालापत्रकांत प्रसिद्ध झालेले लेख हे शास्त्रीबोवांच्या विद्वत्तेची, बुद्धिवैभवाची व विवेचकत्वाची साक्ष देतात. प्रस्तुत ग्रंथकारांत आणखी एक गोष्ट विशेष होती. लक्ष्मी आणि सरस्वती यांचें साहचर्य जसें प्रायः अनुभवास येत नाहीं, त्याप्रमाणें विवेचकता व सहृदयता ह्याही एकसमयावच्छेदानें एके ठिकाणीं आढळत नाहींत. परंतु कृष्णशास्त्री यांच्यामध्यें त्यांचा रमणीय संगम झाला होता. त्यामुळें त्यांच्या विवेचनपद्धतीला अपूर्व सौंदर्य आलें आहे. शास्त्रीबोवांची भाषा शुद्ध, प्रौढ, सरळ, सरस व मनोहर आहे. तिच्यांतील शब्दयोजना अत्यंत मार्मिक आहे. मोठालीं समासघटित पदें त्यांच्या लेखांत प्रायः आढळत नाहींत. यामुळें त्यांच्या लेखांत प्रसाद फार. त्यांची विवेचनपद्धति सुबोध, मुद्देसूद, व्यापक व मनोवेधक आहे. शास्त्रीबोवा शिक्षकही उत्तम होते. कठीण शास्त्रीय विषय देखील ते फार सोप्या व मनोरम

भाषेंत समजावून देत, असें त्यांचे विद्यार्थी सांगतात; आणि हा त्यांचा असाधारण गुण त्यांच्या निबंधांतूनही पूर्णपणें दिसून येतो. विद्वत्ता, विद्याव्यासंग, रसिकता, पांडित्य, लेखनचातुर्य इत्यादि लोकोत्तर गुणांमध्यें कृष्णशास्त्री प्रसिद्ध आंग्लपंडित डॉक्टर जॉन्सन् याच्या तोडीचे होते असें म्हटल्याशिवाय राहावत नाहीं.

लक्ष्मण गणेशशास्त्री लेले.

---

## ३८. नर्मदाप्रदेश.

नर्मदेचा सर्व प्रवाह दोन पर्वतांच्या मधून वाहात आहे. कांठच्या जमिनी खडकाळ आहेत, शेतकीच्या उपयोगाच्या नाहींत असें म्हटल्यास चालेल. यामुळें नर्मदेच्या दोन्ही बाजूंस पुष्कळ जंगल वाढलेलें आहे. पात्र विशाल, कांठीं रेतीचीं विस्तृत वाळवंटें व त्यांत जलप्रवाहानें घासून गुळगुळीत झालेले लहान मोठे, हत्तीएवढालेही, गोटे अशी इची जागोजाग मांडणी आहे. मनुष्यांस विपुल संपत्ति देणारी ही नदी नव्हे, व त्यामुळें तिच्या कांठीं मनुष्यवस्ती फारशी दाट नाहीं. जी थोडी आहे ती धर्माच्या ओढीनें येऊन राहिली आहे. नर्मदेच्या कांठानें प्रवास करणारास जलव्यापारांचें प्राबल्य व कांहीं चमत्कारिक शोभा सहजगत्या दृष्टीस पडते. स्थळीं स्थळीं नदीचें स्वरूप बदलतें. ओघ अनेक प्रकारच्या खडकांतून गेलेला आहे. नर्मदेंतून मूठभर वाळू बाहेर काढल्यास जितक्या रंगाचे खडे हातीं येतील तितक्या रंगाचे दुसऱ्या कोणत्याही नदींत येणार नाहींत. या नदीच्या कांठानें सृष्टीचें जें विशाल व भयंकर स्वरूप दृष्टीस पडतें,

त्यामुळेंच तीस विलक्षण माहात्म्य आलें असावें असें वाटूं लागतें. नर्मदेच्या कांठानें प्रवास करून तीस पूर्ण प्रदक्षिणा करण्याचें कित्येक वैराग्यशील हिंदूंनीं जन्माचें व्रत पत्करलें आहे; व तशाच दातृत्वशील पुरुषांनीं व स्त्रियांनीं तिच्या कांठीं इतकीं अन्नछत्रें, सदावर्तें वगैरे ठेविलीं आहेत कीं, कोणी प्रवासी उपाशीं मरणार नाहीं. हिंदुधर्माचें खरें प्राबल्य या नदीचे कांठीं दिसतें; कारण हिचा पुष्कळ किनारा देशी संस्थानांच्या हद्दींत आहे; व तोही बराच अरण्यमय आहे. अहिंसेचा नियम पुष्कळ पाळला जातो, त्यामुळें जलचर व स्थलचर पशु मनुष्यास फारसे भीत नाहींत. मोरांचा नाच जागोजाग दृष्टीस पडतो. हरणांचे कळप धांवतांना दिसतात. जंगलांतून चाललें असतां वाटाडे हरएक प्रकारच्या सौम्य व हिंस्र पशूंचीं पावलें जमिनीवर उमटलेलीं व लेंड्या पडलेल्या दाखवितात. कित्येक ठिकाणीं गवत उंच वाढून माजलेलें असतें, त्यांत रानडुकरांच्या टोळ्या बसलेल्या असावयाच्या, त्यामुळें आंतून चालण्याचें भय वाटतें. अशा गवतांतून मनुष्याची चाहूल दुरून लागतांच सांबरें उंच शिंगें करून भरधांव पळतांना दिसतात. त्यांचीं तीं शिंगें झाडास कशीं अडकत नाहींत याचा पाहणारास चमत्कार वाटतो, व असल्या जड शिंगांचा या प्राण्यांस उपयोग काय असेल ही शंका मनांत येते. नर्मदाकांठच्या अरण्यांचीं वर्षांत दोन रूपें होतात. उन्हाळ्यांतील रूप निराळें व पावसाळ्यांतील निराळें. उन्हाळ्यांत, प्रखर सूर्याच्या तापानें वृक्षवेलींचीं पानें सुकून खालीं पडतात, जमिनीवर गवत वाळून जातें व वणवा लागून या सर्वांची अग्नीस आहुति होते. जिकडे तिकडे जमीन काळसर व रुक्ष दिसते.

वृक्षांच्या दाट काठ्या जवळ जवळ उभ्या आहेत असें दुरून दिसतें व डोंगरांच्या माथ्यावर दाट झिंज्या उभ्या राहिल्यासारखा भास होतो. जेथें झाडी नाहीं अशा पर्वतांच्या ओळींवर कोठें कोठें भिन्न रंगांच्या खडकांचें चूर्णीभवन होत चाललेलेंही नजरेस येतें. परंतु पावसाळ्याच्या आधींच कित्येक झाडांस नवी पालवी फुटूं लागते, कित्येकांस पावसाळ्यांत फुटते व मग जिकडे तिकडे हिरवागार सृष्टीचा पेहेराव होतो. या सुंदर पेहेरावाचें पूर्ण स्वरूप पावसाळ्याचे अखेरीस दृष्टीस पडतें.

महादेव शिवराम गोळे.

---

## ३९. शिंद्यांचें गजरत्न.

कुंजपुऱ्याची वस्ती अफाट असून ती अगदीं जमिनीवर वसली होती. उत्तर हिंदुस्तानांत गंगा—यमुना नद्यांच्या पाणढाळेच्या मर्यादेंत जमीन किती सपाट असते याची कल्पना दक्षिणेकडील लोकांस येणें शक्य नाहीं. दक्षिणेंत कोंकणांत तर विचारावयासच नको, पण घांटावरसुद्धां अगदीं सपाट जमीन मिळावयाचीच नाहीं. दक्षिणेंत सर्व ठिकाणीं उंचनीच भाग असून मधून मधून डोंगरांच्या ओळीही असतातच. पण गंगायमुनांच्या थडींत शंभर शंभर दोन-दोनशें कोसांत एखादा लहान उंचवटासुद्धां दिसावयाचा नाहीं. तेथील मृत्तिका पांढरट असून जमीन जणूं काय चाकूनें कापल्यासारखी कोसोंगणित सपाट दिसते. या जमिनींत वडाचीं, पिंपळाचीं, आंब्याचीं व निंबाचीं उंच उंच झाडें वाढून तीं तीव्र उन्हापासून लोकांचा बचाव करितात. कुंजपुऱ्याच्या बाहेरील लहान कोटांच्या

आंत शिरलें म्हणजे हाच देखावा आंत दिसतो. जमीन मुबलक असल्यामुळें वस्ती पातळ व अफाट पसरलेली आहे. गांवांतील मुख्य गढीही अशीच अफाट होती व त्या सभोंवतालीं बाहेरच्या कोटापेक्षां कांहीं उंच असा मातीचा कोट होता; व त्याच्याखालीं यमुनानदी वाहात होती. जमीन सपाट असल्याकारणानें नदीच्या तटाची उंची दहापांच हात सुद्धां नसेल. सपाटावरून चालतांना येथें नदी लागेल असें चालणाऱ्याच्या कल्पनेंतसुद्धां येत नाहीं. जमीन सपाट व माती चिक्कण असल्यानें नदीकांठाला दरड म्हणून मुळींच नसते. गढीच्या आंत अनेक विहिरी असून मोठमोठालीं वडाचीं व निंबाचीं झाडें जुनीं व विस्तीर्ण वाढलेली होतीं. त्यांच्या छायेला किंवा बाजूला लहान मातीच्या भिंतीच्या आकाराच्या जागा अनेक होत्या. एके ठिकाणीं एक दुमजली तांबूस दगडांची मोठी इमारत वाड्यासारखी होती. बाकी गढींत काय किंवा शहरांत काय दुमजली इमारत बहुधा दिसत नव्हती. उत्तर हिंदुस्तानांतील मोठमोठाल्या शहरांत-सुद्धां दुमजली इमारती थोड्या असतात, मग कुंजपुऱ्यासारख्या खेडेवजा शहराची हीच स्थिति होती, यांत नवल काय ?

एका विस्तीर्ण जुनाट निंबाच्या झाडापाशीं मात्र कित्येक पुरुषांची गर्दी जमली होती. त्या झाडाखालीं एक उंच सुरेख लठ्ठ हत्ती पायांत शृंखळा बांधलेला झुलत होता. त्याचे पुढील पाय मागील पायांपेक्षां उंच असून मनुष्याच्या वेंगेंत जेमतेम मावतील असे मोठे व एखाद्या आंब्याच्या झाडाच्या खोडाप्रमाणें काळे कुळकुळीत, सोट व मजबूत दिसत होते. त्याचें कपाळ विस्तीर्ण

असून त्याजवर एक त्रिकोणी पांढरा डाग गंधाप्रमाणें शोभिवंत दिसत होता. त्याचीं दोन्ही गंडस्थळें उपडया घातलेल्या लोखंडी कढयांप्रमाणें वर्तुळाकार व उंच दिसत होतीं. त्याची सोंड लांब जमिनीपर्यंत पोंचत असून ती तो वारंवार आपल्या पुढल्या पायांवर आपटीत होता. त्याचें सर्व अंग काळें असून इतकें लठ्ठ होतें कीं, त्यांत हाडाचा कोठेंही मागमूस दिसत नव्हता. इतकें असूनही त्याचे सर्व अवयव इतके आटोपशीर, बांधेसूद व प्रमाणांत होते कीं, तो एखाद्या सुंदर पैलवानासारखा मांडी थोपटीत उभा आहे असें भासत होतें. त्याची मुद्रा व समोरच्या उभारणीचा मोहरा इतका रुबाबदार दिसे कीं, तो एखाद्या राजपुत्राप्रमाणें दिनदुनियेस खातरींत आणीत नाहीं असें दिसे. अशा त्या सुंदर व बलाढ्य हत्तीजवळ त्याचा माहूत उभा असून तो त्यास लांब लांब पण बारीक उंसाचीं पेरें खावयास टाकीत होता, व तो हत्ती आपल्या माहुताकडे लहान माणकासारख्या लाल डोळ्यांनीं वारंवार पहात होता, आणि मधून मधून आनंदाची बारीक आवाजाची चिरफळीसारखी लकेर काढीत होता. अशा त्या हत्तीजवळ बरीचशी लोकांची गर्दी जमा झाली होती, व त्यांतील कित्येक त्या हत्तीस तेथून हालवून दुसरीकडे नेण्याच्या विचारांत होते. मराठ्यांस हा हत्ती सांपडून द्यावयाचा नाहीं असा त्यांचा बेत होता, व नदी पोहून पलीकडे हत्तीस नेण्याविषयीं त्या माहुतास आग्रह करीत होते. तो माहूत जरी त्यास चालवीत होता, तत्रापि तो हत्तीस सोडण्याच्या विचारास त्यांच्या आग्रहास्तव लागला होता. 'हत्तीस उंसाचीं पेरें घालून सोडतों' असें तो म्हणत आहे; तों पांचपंचवीस

मराठ्यांचे स्वार तेथें घुसले. मराठ्यांचा जय झाल्याची बातमी व मराठे गढींत बरोबरच पोंचले. याजमुळें त्या लोकांस हत्ती तेथून काढतां आला नाहीं. हत्तीस नदीपलीकडे नेण्याविषयीं आग्रह करणारे गढींतील शिपाई मराठ्यांस पाहतांच ओळखीच्या चोर-वाटांनीं नाहींसे झाले. ते मराठ्यांचे स्वार शिंद्यांकडील होते. त्यांनीं गढीच्या बाजूनें हल्ला करून गांवांत शिरून किल्ल्यांत प्रवेश केला होता. त्यांस तो हत्ती पाहून फारच आनंद झाला. दत्ताजी शिंद्यांनीं जव्हेरगज नांवाचा हत्ती पंचवीस हजार रुपयांस खरेदी करून आपल्यास बसण्याकरितां ठेविला होता, तो हा हत्ती असून त्यास पाहतांच हरवलेलें रत्न आपल्यास पुनः सांपडलें व गेलेली अब्रू पुनः मिळविली, असें त्यांस वाटलें. दत्ताजी रणांत पडल्यावर त्या हत्तीस हस्तगत करून कुतुबशहानें आपल्या हत्तीखान्यांत ठेविलें होतें. अश्वरत्न, गजरत्न, मणिरत्न, स्त्रीरत्न, आणि नररत्न अशीं पांच रत्नें असतात, व तीं बलिष्ठालाच लाधतात. जो अधिक बलवान् असतो, त्यानें हिसकावून तीं आपल्या उपभोगास घ्यावीं, असा क्रम इतिहासांत एकसारखा दृष्टीस पडतो. असो. तें गजरत्न आपल्यास पुनः लाधलें असें पाहून शिंद्यांकडील स्वारांस अत्यानंद झाला यांत नवल नाहीं. त्या हत्तीचा माहूतही शिंद्यां-चाच होता. हत्तीचा माहूत सहसा बदलीत नाहींत. बहुधा जो माहूत हत्तीला लहानपणापासून वाढवितो त्याजवरच तो प्रीति करतो, व त्याचाच तो जन्मभर असतो.

चिंतामण विनायक वैद्य.

---

## ४०. काव्याचें स्वरूप.

कोणत्याही भाषेंत अत्यंत उत्तम व सुरस ग्रंथ म्हटले म्हणजे तींतील कविता होत. त्या कविताग्रंथांचें उत्तम ज्ञान झाल्यावांचून त्या भाषेचें मार्मिक ज्ञान शिकणारास होत नाहीं. दुधास जसें लोणी, झाडास जसें फूल, तशी भाषेस कविता होय. मनोरंजन करण्याचें जें भाषेंत सामर्थ्य असतें तें तिच्या कवितारूप ग्रंथांत मुख्यत्वेंकरून असतें.

आतां कविता म्हणजे काय? तिचें लक्षण कोणतें? ती ओळखावी कशी? या गोष्टींचा आपण थोडासा विचार करूं. आतां दुसऱ्या प्रकारच्या लेखापासून किंवा रचनेपासून कवितारूप लेख किंवा ग्रंथ ज्या गुणांनीं भेद पावतो, त्या गुणांचें वर्णन करून कवितेचें स्पष्टपणें लक्षण बांधणें ही गोष्ट किती कठीण आहे, हें आम्हीं जाणत आहों. कवितेचें मुख्य स्वरूप सौंदर्य होय; व कोणत्याही सौंदर्याचें स्पष्टपणें वर्णन करून, तें म्हणजे काय पदार्थ आहे हें सांगणें किती कठीण आहे, हें सुज्ञ वाचणारांनीं विचार केला असतां सहज ध्यानांत येईल. फुलें, इमारती, तसबिरी, मूर्ति इत्यादिकांचा सुरेखपणा; द्राक्षें, आंबे इत्यादिकांची उत्तम रुचि; राग व रागिण्या यांचें माधुर्य इत्यादिकांचें वर्णन जसें पूर्णपणें व उघडपणें होत नाहीं, तसाच कवितेचाही प्रकार आहे. असें आहे तथापि तिचे कांहीं कांहीं गुण उघड करून दाखविण्याविषयीं यत्न करणें उपयोगी आहे, असें समजून तो यत्न आम्हीं केला आहे.

साधारण लोकांच्या समजुतीनें छंदोबद्ध जो ग्रंथ, तो कविता होय. म्हणजे जो ग्रंथ आर्या, श्लोक, साक्या, दिंड्या, ओंव्या

इत्यादि कोणत्या तरी वृत्तानें लिहिला असतो, त्यास ते कविता समजतात. परंतु ही त्यांची समजूत खरी नाहीं. कविता बहुत-करून छंदोबद्धच असते खरी, तथापि ग्रंथास काव्यपणा येण्यास तो ग्रंथ छंदोबद्ध असला पाहिजे, असा नियम नाहीं; व जो छंदो-बद्ध असतो, तो म्हणजे, काव्यरूपच असतो, असाही नियम समजूं नये. संस्कृतांत बाणकविकृत कादंबरी, दंडीनामक कवीनें केलेलें दशकुमारचरित इत्यादि ग्रंथ छंदोबद्ध नसतांही तीं काव्यें आहेत. मनुसंहिता वगैरे धर्मशास्त्रांतील व सिद्धांतशिरोमणी, वाग्भट वगैरे ज्योतिषाचे व वैद्यकाचे ग्रंथ हे छंदोबद्ध असतांही तीं काव्यें नव्हेत.

यावरून केवळ छंदोबद्ध असल्यानें ग्रंथास काव्यपणा येत नाहीं, हें उघड झालें. तर तो येतो कशानें ? असा वाचणारानें प्रश्न केल्यास, त्यास आम्ही असें उत्तर देतों कीं, ग्रंथास कविता हा शब्द शोभण्यास त्या ग्रंथांतील अर्थ सुंदर म्हणजे मनोरंजक, चमत्कारिक असा असला पाहिजे. ग्रंथ कितीही उपयोगी असला व त्याच्या ज्ञानानें वाचणारास कितीही फायदा किंवा उपदेश होत असला, तरी तेवढ्याच कारणानें तो ग्रंथ कवितारूप होत नाहीं. त्यास कविता हें नांव साजण्यास तो ग्रंथ मनोरंजक असला पाहिजे, म्हणजे त्या वाचण्यानें वाचणाराच्या चित्तास उल्हास किंवा चमत्कार वाटला पाहिजे. जशी उपयोगाचा जिन्नस व शोभेचा जिन्नस ( दागिना ) यांत तफावत आहे, तशी उपयुक्त ग्रंथ व मनोरंजक ग्रंथ ( काव्यें ) यांत तफावत आहे. चाकू, कातर, कुदळ. पहार इत्यादि उपयोगाच्या वस्तु आहेत; परंतु त्यांस कोणी

भूषणें म्हणत नाहींत. तसें गणित, भूमिति, अर्थशास्त्र, व्याकरण इत्यादिकांवरील ग्रंथ अत्यंत उपयुक्त खरे, परंतु तीं काव्यें नव्हेत. यावरून हें स्पष्ट आहे कीं, काव्यांतील अर्थ उपयुक्त किंवा बोधपर असला तर असेल, परंतु तो तसा असलाच पाहिजे, असा नियम नाहीं, व तो तसा नसला तरी काव्यांत कांहीं एक न्यूनता आली, असें नाहीं. तो अर्थ मनोरंजक व चमत्कारिक असला म्हणजे पुरे आहे. सारांश, कवितेचें मुख्य लक्षण म्हटलें म्हणजे तींतील अर्थ मनोरंजक, रसिक, चमत्कारिक असा असला पाहिजे, असें सिद्ध होतें. हें वरील सांगितलेलें लक्षण आमच्याच मतानें आम्हीं लिहिलें आहे असें नाहीं; तर संस्कृत भाषेंतील व इंग्रजी वगैरेंतील प्राचीन व अर्वाचीन मोठमोठ्या ग्रंथकर्त्यांचेंही मत असेंच आहे.

कृष्णशास्त्री चिपळूणकर.

